# भारतवर्षाचा संक्षिप्त इतिहास

( सचित्र )

भाग १ ला—प्राचीन भारत

—लेखक—

डॉ० बालकृष्ण, एम्. ए., पीएच्. डी. [ लंडन ]

प्रिन्सिपॉल, राजाराम कॉलेज, कोल्हापूर.

—भाषांतरकार—

बाळकृष्ण रामचंद्र कोलटकर, एम्. ए.,

मुख्याध्यापक, विद्यापीठ, कोल्हापूर.

सन १९२८ इ. ]  [ किंमत ०-१२-०

# दोन शब्द.

इतिहासलेखन व त्याचें अध्ययन या बाबतींत गतकालीन रूक्ष गोष्टींच्या संग्रहापेक्षां त्या गोष्टींचें पद्धतशीर विवरण व मांडणी यांचें फार महत्व आहे. त्यामुळें आधींच उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक साहित्यांत प्रस्तुत पुस्तकाची भर कां घातली याचें कारण सांगणें अवश्यक नाहीं. इतिहासाच्या वाचनानें राष्ट्राभिमानाची जागृति आणि शीलसंवर्धन होऊन राष्ट्रांतील लोकांच्या बऱ्यावाईट कृत्यांकडे मार्मिक परंतु विशालदृष्टीनें पाहण्याची प्रवृत्ति वाचकांमध्यें उत्पन्न झाली पाहिजे. याकारितांच इतिहास ध्येयदर्शक झाला पाहिजे. राष्ट्रीय भावनेचा परिपोष होण्यासाठीं विभूतिपूजा आणि गतकालीन वैभव याची जाणीव उत्पन्न झाली पाहिजे. एकाद्या राष्ट्राचे व राष्ट्रीय शीलाचे उत्कर्षापकर्ष, दौर्बल्य आणि औदात्य व यांपासून उत्पन्न होणारी संस्कृति याचे वाचकानें लक्षपूर्वक ग्रहण केलें पाहिजे. भारतीय इतिहास विशेषत: शेजारच्या राष्ट्रांच्या इतिहासाशीं कार्यकारणभावानें निगडीत असल्यामुळें, त्याचें परिशीलन करतांना इतर देशांतील समकालीन गोष्टींचा विचार करणें जरूर आहे. एकाद्या विवक्षित भागाच्या इतिहासाचें परिशीलन करीत असतां त्या व्यतिरिक्त हिंदुस्थानांतील इतर भागाच्या इतिहासाबद्दल विद्यार्थी अज्ञानांत राहतात. हिंदुस्थानचा समुद्रावरील व्यापार, स्थापत्य व उद्योगधंदे, ललितकलेचे चिरकाल टिकणारे आदर्श यांबद्दल त्यांना मुळींच कल्पना नसते. थोड्या प्रमाणांत कां होईना, पण या सर्व गोष्टी शाळेच्या क्रमिक पुस्तकांतूनच शिकविल्या गेल्या पाहिजेत, व तेंच साधण्यासाठीं प्रस्तुत लेखकानें हें पुस्तक लिहिण्याचें धाडस केलें आहे.

हें पुस्तक लिहिण्याच्या बाबतींत पुष्कळ मंडळींनीं, विशेषत: श्री० बी. आर्. कोल्हटकर, एम्. ए., प्रो. डी. एस्. पंगु, एम्. ए., आणि डी. सी. देशपांडे, बी. ए., व ए. जी. देसाई, बी. ए. या गृहस्थांनीं सदैव उत्साहानें व प्रेमपूर्वक कळकळीनें मदत करून प्रस्तुत लेखकाला उपकृत करून ठेवलें आहे, हें सांगण्यास मोठा आनंद वाटतो. त्याच-

प्रमाणें बऱ्याच म्युझिअमचे व आर्ट गॅलरीचे क्यूरेटर्स, कांहीं चित्रांचे खासगी संग्राहक, विशेषतः श्रीमंत पंतप्रतिनिधीसाहेब, औंध, मॅकमिलन कंपनी व तशीच इतर मंडळी यांनीं माझें पुस्तक सुशोभित करण्यासाठीं त्यांच्याकडे असलेलीं चित्रें व नकाशे छापण्याची मला परवानगी दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पुस्तकाचें प्रकाशन घाईघाईनें झाल्यामुळें कांहीं दोष नजरचुकीनें राहिले असतीलच, ते सर्व पुढील आवृत्तींत दूर होतील, अशी मला बळकट आशा आहे.

---

# इतिहासाध्यापकासाठीं दहा नियम

(१) शिकवावयाचा पाठ स्वतः तयार केल्याशिवाय व नकाशे आणि चित्रें यांच्या सहाय्याशिवाय शिकवूं नये. (२) इतिहासांतील पाठ मराठी क्रमिक पुस्तकांतील पाठाप्रमाणें विद्यार्थ्यांना सर्वच वाचावयास सांगूं नये. (३) वर्गांत इतिहास कधींही शिक्षकानें वाचून दाखवूं नये, कारण त्यामुळें विद्यार्थी दुर्लक्ष करितात. (४) विद्यार्थ्यांना घरीं उत्तरें लिहिण्यासाठीं निदान दोन प्रश्न देण्यास विसरूं नये; लेखनानें विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं आपल्या मनांतील विचार प्रगट करण्याची शक्ति वाढते. (५) शिकविलेल्या भागांतील प्रश्न वारंवार विचारल्याशिवाय केव्हांही राहूं नये. (६) विद्यार्थ्यांची घोकंपट्टीची संवय शक्य तितकी मोडून टाकावी.(७)विषयाचें पृथःकरण करून, सारांश सांगून, गोष्टी सांगून किंवा तुलना करून विषय सोपा व विशद करावा. (८) शंका विचारणें व चतुरपणें विषयाचें ग्रहण करणें या बाबतींत विद्यार्थ्यांना प्रोत्साहन द्यावें.(९) चित्रें व नकाशे यांचें सूक्ष्मदर्शक यंत्राच्या सहाय्यानें निरीक्षण करून त्यांपैकीं प्रत्येकांतील विशेष विद्यार्थ्यांना समजून द्यावेत. (१०) नेमलेल्या क्रमिक पुस्तकाशिवाय इतिहासाचीं इतर पुस्तकें वाचून, ऐतिहासिक स्थळें प्रत्यक्ष पाहून व शक्य त्या इतर मार्गांनीं ऐतिहासिक माहिती मिळविण्याची व इतिहासाकडे चिकित्सक दृष्टीनें पाहण्याची विद्यार्थ्यांत आवड उत्पन्न करावी.

ता. १।६।२८. बाळकृष्ण.

# भारतवर्षाचा संक्षिप्त इतिहास.

## भाग पहिला—प्राचीन भारत.


| | | |
|---|---|---|
| | | पृष्ठ. |
| प्रकरण १ लें. | भारतवर्षाची स्वाभाविक स्थिति. | १ |
| ,, २ रें. | प्राचीन भारतवर्षाच्या इतिहासाचीं साधनें. | १० |
| ,, ३ रें. | वैदिक काल. | १५ |
| ,, ४ थें | आर्ष काल. | २१ |
| ,, ५ वें. | बौद्ध काल. | ३५ |
| ,, ६ वें. | मगधाचा इतिहास. | ४६ |
| ,, ७ वें. | भारतवर्षाचे ग्रीक राजे. | ६७ |
| ,, ८ वें. | गुप्त वंश. | ७६ |
| ,, ९ वें. | कनोजचे सम्राट्. | ८४ |
| ,, १० वें. | रजपूत काल. | ९० |
| ,, २१ वें. | दक्षिणी राज्यांचा इतिहास. | १०० |
| | प्रश्नमाला. | ११७ |




# चित्रांची यादी


१ रामचंद्र व विश्वामित्र. मु. पृ.
२ इंद्रप्रस्थामधील पांडवगड २८
३ भगवान् बुद्ध ३५
४ नेमिनाथाचें जैन देवालय व शत्रुंजय ३६
५ जिन भगवान् ३६
६ यक्षाची मूर्ति ४६
७ विजिगीषु शिकंदर व आर्यपुत्र दारा ४८
८ इराणी पोषाखांत शिकंदर ५१
९ अशोकाचा स्तंभ व बार्हुतचें द्वार ५७
१० नकाशा, खि. पू. ३२७ ते इ. स. १४० ६२
११ सांचीचें द्वार ६५
१२ जावा बेटांतील बोरोबुदूरचें देवालय. ७३
१३ त्यांतील खोदकाम व महाद्वार. ७३
१४ अंगकोर देवालय-कंबोडिआ ७४
१५ कार्ले येथील लेणी, चैत्य व सांची स्तूप. ७७
१६ महेश रूपांत शिवाची मूर्ति ७७
१७ नकाशा, इ.स. ३२० ते ६४७ मधील ७८
१८ अजंठा येथील चित्रकला ८१
१९ वामन देवालयांतील खोदकाम ९७
२० चौमुख देवालय १००
२१ अमरावती स्तूप १०३
२२ कैलासमंदीर १०६
२३ हालबीद येथील होयसाळेश्वराचें मंदीर १०८
२४ अंबाबाईचें देवालय- कोल्हापूर १११
२५ खिद्रापूरचें देवालय- कोल्हापूर स्टेट १११
२६ राजाराणीचें देवालय- ११२ भुवनेश्वर.
२७ मदुरा येथील देवालय, महाबलीपुरम् व तंजावर ११४




# प्राचीन भारतांतील राजांचें वंश.

खालील सन स्मिथप्रमाणें आहेत.

**शैशुनाग आणि नन्दवंश.**

शिशुनाग व त्याच्या पुढील तीन राजे.... खि.पू. ६४२--५८२
बिंबिसार.... ... ५८२--५५४
अजातशत्रू.... ... ५५४-५२७
त्याच्या पुढील राजे. ५२७--४१३
महापद्मनंद व त्याचे वारस............. ४१३--३२१

**मौर्यवंश**... ... ... ३२१--१८४
चंद्रगुप्त.... ... ... ३२१--२९७
बिंदुसार... ... ... २९७--२७२
अशोक.... ... ... २७२--२३२
अशोकाचा वंशज.... २३२--१८४

शुंगवंश खि पू. १८४ -७२
काण्ववंश... ... ... ७२--२७
**शक राजे.** सु. खि.पू. १२० - इ.स ४००
**कुशान वंश** सु. इ. स. ४५--२५०
कैडफायसिस्. इ. स. ७८--११०
एक अप्रसिद्ध राजा. ११०--१२०
कनिष्क.... ... ...१२०--१६२
हविष्क.... ... ...१६२--१८२
वसुदेव.... ... ...१८२--२२०

**गुप्तवंश....** ... ३२०--६००
चंद्रगुप्त.... ... .... ३२०--३३०
समुद्रगुप्त.... ... ...३३०--३७५
विक्रमादित्य...... ... ३७५--४१३
कुमारगुप्त. इ.स. ४१३--४५५
स्कंधगुप्त....... ... ४५५--४८०
व त्याचे वंशज......४८०--६००

खालील सन अजमासे समजावयाचे.

**स्थानेश्वर-कनोजचे राजे.**

शिलादित्य, प्रभाकर, राज्यवर्धन, हर्षवर्धन व त्याचे वंशज. ५५०--८१०
भट्टवंश. ८१०--१०९०

**रजपूत वंश.**

सिसोदिया [चितोड] ६०० पासून--
तोमार [दिल्ली] ७३६--११७०
चालुक्य [गुजराथ] ८००--१२९८
पाल [बिहार] ५५५--११४०
सेन [बंगाल] ९८६--१२००
रजपूतवंश [काश्मीर] ५२७--१३३९
केसरी [ओरिसा] ४७६--११३२
गंग [ओरिसा] ११३२--१५३४

**दक्षिणी राज्यें.**

आंध्र वंश खि.पू. २२०--इ.स. २३६
१ सीमुक खि. पू. २२०--१९७
२ कृष्ण ,, १९७--१७९
९ शातकर्णी ,, ६३--४५
१४ पुलुमायी (१),, २६--इ.स.६
१७ हाल इ. स. ६९--७४
२३ विलीवायकुर ,, ११३--१३८
२४ पुलुमायी (दुसरा) १३८--१७०

२७ यज्ञश्री इ.स. १८४–२१३

स्मिथनें दिलेले वरील सन डॉ. भांडारकर यांना मान्य नाहींत.

सीमुकानें काण्व वंशाचा शेवट करून मगध राज्य आपल्या राज्यास जोडलें असें पुराणाधारावरून आम्ही पृष्ठ ६६ वर लिहिलें आहे. परंतु स्मिथनें असें म्हटलें आहे कीं, तेरावा आंध्र राजा शातशातकर्णी किंवा त्याच्या पूर्वी झालेल्या किंवा मागून आलेल्या राजांपैकीं कोणी तरी एकानें वरील गोष्ट केली असली पाहिजे.

बदामीचे चालुक्य. ५५०--७५३

**कल्याणीचे पश्चिमी चालुक्य**
**( ९७३–११८७ )**

| | इसवी सन |
|---|---|
| तैलप [१ला] | ९७३–९७ |
| सत्याश्रय | ९९७–१००८ |
| विक्रमादित्य [१ला] | १००८–१८ |
| जयसिंह | १०१८–४० |
| सोमेश्वर [१ला] | १०४०–६९ |
| ,, [२रा] | १०६९–७६ |
| विक्रमादित्य [२रा] | १०७६–१६ |
| सोमेश्वर [३रा] | ११२६–३८ |
| जेगदेकमल्ल | ११३८–५० |
| तैलप २[रा] | ११५०–६२ |
| कालाचुरी वंश | ११६२–८२ |
| सोमेश्वर [४था] | ११८२–८७ |

**राष्ट्रकूट वंश [ ७५३–९७३ ].**

या मुदतींत या वंशानें राज्य केलें हें निर्विवाद आहे. परंतु याहि मुदतीच्या पूर्वी कांहीं काळ व नंतर कांहीं काळ या वंशानें राज्य केलें असावें असें वाटतें.

| | |
|---|---|
| दंतिदुर्ग. | इंद्र (३रा). |
| कृष्ण (पहिला). | अमोघवर्ष (२रा) |
| गोविंद [२रा]. | गोविंद (४था). |
| ध्रुव. | अमोघवर्ष (३रा) |
| गोविंद [३रा] | कृष्ण [३रा]. |
| अमोघवर्ष [१ला]. | कोटिक. |
| कृष्ण [२रा] | कर्क (२रा). |

दंतिदुर्गाच्या पूर्वीं या वंशांतील पहिले पांच राजे मांडलीक होते; यास्तव वरील यादींत त्यांचीं नांवें दिलेलीं नाहींत.

कोल्हापूरचे शिलाहार १०५८-१२१५

द्वारसमुद्रचे होयसाळ १११०-१३२७

**देवगिरीचे यादव**
**११८७ ते १३१८ इ. स.**

(राज्यांताचीं वर्षें.)

भिल्लम. ११८७ ते ११९१.

| | |
|---|---|
| जैत्रपाल. १२१०. | रामदेव. १३०८. |
| सिंहन. १२४७. | शंकर. १३१२. |
| कृष्ण. १२६०. | हरपाल. १३१८. |
| महादेव. १२७०. | |

# स्मरणीय गोष्टींचे काल.

इ. स. पू. सुमारें—

३५०० मोहन-जो-दारोचें नगर वसविलें गेलें.

१४०० कुरुक्षेत्राचें महायुद्ध.

१००० सुलेमान बादशहाचे वेळीं भारतवर्षाशीं व्यापार सुरू होता

५९९ते ५२७ जैनधर्मप्रवर्तक महावीराचा काल.

५६७ते४८३ भगवान् बुद्धाचा काल.

५१६ दारानें हिंदुस्थानचा पश्चिम भाग जिंकला.

४८३ पहिली बौद्ध सभा.

४१५ टिसिअस नामक एका ग्रीकाने भारतवर्षाचा वृत्तान्त लिहिला; त्याचा सारांश अजूनही उपलब्ध आहे.

३८३ वैशाली येथें दुसरी बौद्ध सभा.

३१५ उत्तर हिंदुस्थानांतील दुष्काळामुळें दक्षिणेंत जैन वसाहत झाली.

३०५ चंद्रगुप्त व सेल्युकस् यांच्यामध्यें युद्ध होऊन इराणपर्यंत आर्य राज्य पसरलें.

२६१ कालिंगचें विजय.

२२० दक्षिण देशांत आन्ध्र राज्याची स्थापना.

२०६ एन्टीआकस्नें भारतावर आक्रमण केलें.

१८४ मौर्य वंशाचा नाश झाला, व पुष्यमित्र शुंग यानें मगध देशाचें राज्य प्राप्त केलें.

१७० चीनमधून यूची जात घालविली गेली.

१६० यूची जातीनें मध्य आशियांतून शक लोकांस हाकून दिलें.

१५५ काबूलच्या मिनँडर बादशहानें हिंदुस्थानावर आक्रमण केलें.

१५० पतंजलि ऋषीचा काल.

१४० ते १५५ शक जातीनें शिस्तान, तक्षशिला, मथुरा इत्यादि स्थळें जिंकलीं.

६८ दहा हजार यहुदी लोक पॅलेस्टाईन सोडून सपरिवार मलबारांत येऊन राहिले.

५७ विक्रम संवतारंभ.

२७ काण्व वंशाचा नाश; हिंदुस्थानांतून रोममध्यें वकील पाठविले.

इ. स. ७८ शालिवाहन शकाचा आरंभ; दुसरा कैड्फायसिस् याचा राज्यारंभ व दिगंबर जैन धर्माचा उद्भव.

९९ रोमचा राजा ट्रोजन याचे दरबारांत भारतीय वकिलाचें गमन

१४० चतुर्थ बौद्ध सभा; महायान संप्रदायाचा उद्भव.

१३८ अण्टानिनअस् पायसच्या दरबारात भारतीय वकिलाचा प्रवेश.

१३० ते १५० रुद्रदामन नामक पश्चिम क्षत्रपाचें राज्य.

३२० गुप्तवंशाचा आरंभ.

३३६ कॉन्स्टँटिनोपलमधील कॉन्स्टंटाईनच्या दरबारात भारतीय वकिलाचा प्रवेश.

३९१ चंद्रगुप्तानें पश्चिम क्षत्रपास पराजित केले

४०५ते ४११ भारतवर्षांत फाहीनचा प्रवास.

४५५ स्कंदगुप्ताचा राज्यारंभ. हूणांची पहिली स्वारी.

४७०ते४८० हूणांची दुसरी स्वारी.

५२०ते५४० मिहिरकुलाचें उत्तरीय भारत व काश्मीर यामध्यें राज्य.

५५० नौशेरवांच्या आज्ञेनें पारसी भाषेंत पंचतंत्राचें भाषांतर.

६०८ते६४२ दु० पुलकेशीचें राज्य

६२५ इराणांचा राजा दुसरा खुसरू यानें पुलकेशीच्या दरबारांत आपला वकील पाठविला.

६३०ते ६४१ ह्यूनसांगचा प्रवास.

६४१ ह्यूनसांगची पुलकेशीशीं भेट.

७१२ ते ७५० सिंधप्रांतावर मुसलमानांचा ताबा.

७८८ शंकराचार्यांचा जन्म.

१०१८ते१०६० माळव्याच्या भोजराजाची कारकीर्द.

१०२२ मुसलमानांचा लाहोरवर अंमल.

१११०ते४१ विष्णुवर्धनाचें ( होयसाळवंशीय ) राज्य.

११७०ते९३ कनोजच्या जयचंद्राची कारकीर्द.

११९१ तरायांच्या लढाईत महम्मद घोरीचा पराभव.

११९२ तरायांच्या लढाईत पृथ्वीराजाचा पराभव.

१२९४ अल्लाउद्दीन खिलजीची देवगिरीवर स्वारी

१३०६ते१२ मलिक काफूरच्या दक्षिणेवर स्वाऱ्या.

१३१८ अल्लाउद्दीनचा पुत्र मुबारक याची देवगिरीवर स्वारी—हरपालचा वध.

१३३६ विजयनगरची स्थापना.

# शुद्धिपत्र.

| पान | विभाग | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | २ | श्रीरामचंद्राचा | कौरवपांडवांचा |
| ७ | ७ | बंगाली, ब्राह्मण | बंगाली ब्राह्मण |
| ९ | ११ | ६० लाख | ६४० लाख |
| २८ | १४ | ४८ हजार | सुमारें दोन लक्ष |
| ३६ | २ | ४२ वर्षे | कांहीं वर्षे |
| ३७ | ४ | १५ लाख | १२ लाख |
| ३७ | ५ | खि. पू ६७ | खि. पू. ५६७ |
| ४६ | १ | मौर्य वंश ३२१–१७४ | मौर्य वंश ३२१-१८४ |
| ४६ | १ | शुंगवंश १७४-७२ | शुंगवंश १८४-७२ |
| ४९ | ७ | एशिया, कोचक | एशिया मायनर |
| ५० | ९ | तेव्हांपर्यंत | हा शब्द येथें नको |
| ५२ | १२ | न्यायकोर्टें | दिवाणी न्यायकोर्टें |
| ५२ | १४ | सिंधप्रांतीं | सतलज नदीपर्यंत |
| ५७ | २१ | पूर्व | हा शब्द येथें नको |
| ५८ | २३ | तो म्हणतो | स्ट्रॅबो म्हणतो |
| ७२ | १२ | राज्याचा शेवट | राज्याचा आरंभ |
| ७३ | २ | अंगकोर कंबोडिया | अंगकोर ( कंबोडिया ) |
| ७५ | १६ | खि. पू ४००शेंपासून | खि. पू. ४ शेंपासून |
| ७५ | १ | लारीय, नंदनगड | लारीय नंदनगड |
| ७९ | ६ | ४५३ | ४५५ |
| ८५ | (१) | जनावरें | हत्ति |
| ८८ | २ | चातुर्वर्ण्य सुरू झालें | चातुर्वर्ण्य पुनः सुरू झालें. |
| ९३ | ५ | आनन्गपाल | अनंगपाल |
| ९५ | ८ | वालंदा | नालंदा |
| ९६ | ११ | गझवीनें | गझनवीनें |
| १०२ | ५ | सुरापुर | सुराष्ट्र |
| ११३ | ३२ | पुलकेशाचा | दुसऱ्या पुलकेशीच्या |
| ११४ | २९ | १००० मध्यें | सुमारें १०००मध्यें |

## टीपा.

**पान २**—ब्रह्मदेश व बलुचिस्थान वगळल्यास हिंदुस्थानचें क्षेत्रफळ १५ लाख चौरस मैल आहे; परंतु ब्रह्मदेश व बलुचिस्थान यांच्या क्षेत्रफळांचा समावेश केल्यास तें १८ लाख चौरस मैल होतें. हिंदुस्थानच्या साम्राज्यांतील लोकसंख्या ३२ कोटी आहे. ब्रह्मदेश व बलुचिस्थान येथील लोकसंख्या वगळल्यास ती ३०॥ कोटी होते. या ३२ कोटींपैकीं, २४·७ कोटी लोक ब्रिटिश हद्दींत रहात असून ७·३ कोटी संस्थानांत राहतात.

**पान ३६—महावीराचा निर्वाण**—खि. पू. ५२७ हें वर्ष महावीराच्या निर्वाणाचें आहे असें सर्वसाधारणपणें समजलें जातें. जाकोबीच्या म्हणण्याप्रमाणें हा सन ४७७ खि. पू. आहे. [ Smith's Oxford History of India. P. 51.]

**पान ३९—बुद्धाचा मृत्यु**—खि. पू. ४८३ या वर्षी बुद्धाचा मृत्यु झाला असें फ्लीटचे म्हणणें आहे. परंतु बुद्ध खि.पू. ५६७ या वर्षी जन्मला, व ८० वर्षें वयाचा होऊन मेला, असें मानिल्यास त्याच्या मृत्यूचा सन खि. पू. ४८७ येतो.

**पान ४६।४७—शैशुनाग वंश**—या वंशाच्या आरंभाचे व अंताचे सन अजून ठरलेले नाहींत. निरनिराळे लेखक, किंवा एकच लेखक आपल्या निरनिराळ्या आवृत्त्यांत, निरानिराळे सन देतात, हें खालीं दिलेल्या गोष्टीवरून सहज कळेल. त्यामुळें एकाच राज्याचा काल निरनिराळा सांगण्यांत येतो.

स्मिथकृत Early History of India:—

| आवृत्ति. | वंशाचा आरंभ | अंत. |
|---|---|---|
| १९०४ | ६०० खि.पू. | ३६१ |
| १९१४ | ६०० ,, | ३७२ |

स्मिथकृत Oxford History of India:—

| आवृत्ति. | वंशाचा आरंभ. | अंत. |
|---|---|---|
| १९२३ | ६४२ खि.पू. | ४१३ |

स्मिथच्या मताप्रमाणें या वंशांतील पहिल्या चार राजांनीं ६० वर्षें राज्य केलें. वायुपुराणानुसार यांनीं १३६ वर्षें राज्य केलें. परंतु त्यांनीं ८४ वर्षें राज्य केलें असें आम्हीं मानितों. पांचवा राजा बिंबिसार यानें [महावंशांत लिहिल्याप्रमाणें] ५२ वर्षें राज्य केलें; त्यामुळें आमच्या मताप्रमाणें शैशुनाग वंशाचा आरंभ

| | | |
|---|---|---|
| खि. पू. | ५५४ | अजातशत्रूचें राज्यारोहण ( स्मिथ ) |
| | + ५२ | बिंबिसार |
| | + ८४ | पहिले चार राजे |

खि. पू. ६९० असा येतो.

**पान ८४- भीनमाल-** हें जोधपूर संस्थानांत दक्षिणेस आहे. ह्मणून प्रभाकरवर्धन यानें राजपुतान्यांतील गुर्जरांचा पराभव केला असें लिहिलें आहे. परंतु हे पंजाबमधील गुजराथ जिल्ह्याचे गुर्जर असावेत असें कांहींचें म्हणणें आहे.

**पान ४७**-शैशुनाग वंशाचा अंत खि. पू. ४१३ हा नवीन मतानुसार दिला आहे. व ४८ पानावरील हाच सन खि. पू. ३७० असा आहे तो जुन्या मताप्रमाणें पडला आहे.





रामचंद्रादि राजपुत्रांना नेण्याकरतां विश्वामित्र राजा दशरथाकडे आला आहे. (पृष्ठ १)

# भारतवर्षाचा संक्षिप्त इतिहास.

## विभाग पहिला.

### प्राचीन भारतवर्ष.

### प्रकरण १ लें.

#### भारतवर्षाची स्वाभाविक स्थिति.

१. स्वाभाविक परिस्थिति आणि मनुष्य—देशाच्या स्वाभाविक अगर भौगोलिक परिस्थितीचा तेथील मूळ रहिवाशांवर फार मोठा परिणाम होत असतो. समाजाच्या बाल्यावस्थेंत तर या परिस्थितीच्या एकतंत्री सत्तेखालींच मनुष्याला रहावें लागतें. त्यांत एक प्रकारची संघटना, सुव्यवस्था व संघशक्ति येऊन तो सुधारणेच्या मार्गास लागेपर्यंत त्याची रहाणी व त्याचें भाग्य अनेक प्रकारें कमीजास्त प्रमाणांत निश्चित करणारी देवता हीच होय. अर्थात् मानवी शक्तींचा कांहींसा विकास झाल्यावर हे संबंध बदलतात. स्वाभाविक परिस्थितीचा प्रभाव कमी होऊं लागतो एवढेंच नव्हे तर अखेर ती मनुष्याची दासी बनते. वस्तुतः मानवी शक्ति आणि स्वाभाविक शक्ति यांच्या एकमेकांवर क्रिया प्रतिक्रिया नेहमीं सुरू असतात. देशांतील रहिवासी कोणतें अन्नवस्त्र वापरतात, तें मिळण्याला त्यांना थोडे कष्ट पडतात कीं अधिक पडतात, त्यांचे उद्योग कोणकोणत्या प्रकारचे आहेत, परदेशीय लोकांशीं त्यांचे संबंध कशा प्रकारचे आहेत इत्यादि अनेक गोष्टी देशाच्या हवापाण्यावरूनच मुख्यत्वेंकरून ठर-

तात. यापेक्षां महत्वाची अशी दुसरीहि एक गोष्ट आहे. ती ही कीं, देशांतील निसर्गदृश्यानुसार तेथील रहिवासी यांचे विचार, विश्वास, सिद्धांत, शील आणि आचार बनत असतात.

२ भारतवर्षाची स्वाभाविक स्थितिः—भारतवर्षाच्या स्वाभाविक स्थितीचा त्याच्या इतिहासावर जो परिणाम झाला आहे त्याच्या इतका मोठा परिणाम बहुधा इतर देशांमध्यें दृष्टीस पडत नाहीं. येथील जमीन अति सुपीक असून थोड्याशा कष्टानें हजारों प्रकारचें उत्तम पीक देणारी आहे. नाना प्रकारच्या हवापाण्यामुळें हरएक प्रकृतीच्या मनुष्याला येथें राहण्याची सोय आहे. तसेंच, भूगोलदृष्टया भारतवर्ष एक द्वीपकल्प असून पश्चिम आणि पूर्वोत्तर दिशेकडून आंत येण्यास वाटा आहेत. त्यांतून निरनिराळया वेळीं विविध लोकांच्या टोळया या देशांत येऊन राहिल्या आहेत. टोळधाडीप्रमाणें आलेल्या या टोळ्यांतील लोक जेते म्हणून आले, परंतु महासागरांत छोट्या नद्या लुप्त होतात त्याप्रमाणें येथील प्रचंड लोकसंमर्दांत ते विरून गेले आहेत. या कारणाकरितां भारतवर्षाच्या भौगोलिक स्थितीचा थोडक्यांत विचार करणें जरूर आहे.

अर्थ व सीमा—आज हिंदुस्थान किंवा इंडिया ह्मणून प्रसिद्ध असलेल्या आपल्या देशाला भारतवर्ष हें नांव श्रीरामचंद्राचा भरत नांवाचा एक महापराक्रमी पूर्वज होऊन गेला, त्याच्यापासून प्राप्त झालें आहे. याच्या पूर्वेस उत्तरेस व पश्चिमेस अखिल जगांतील सर्वांत उंच पर्वत हिमालय ( बर्फाचें स्थान ) हा दोन हजार मैलपर्यंत लांब व ठिकठिकाणीं ५००शें मैल रुंद पसरला आहे. पूर्वेस ब्रह्मदेश आणि बंगालचा उपसागर, दक्षिणेस हिंदी महासागर, पश्चिमेस अरबी समुद्र, बलुचिस्थान व अफगाणिस्थान आणि उत्तरेस तुर्कस्थान व तिबेट अशा हिंदुस्थानच्या चतुःसीमा आहेत.

विस्तार—भारत वर्षाची लांबी १९०० मैल, रुंदी १८०० मैल आणि क्षेत्रफळ १५ लाख चौ. मैल आहे. या विशाल देशांतील लोकसंख्या ३२ कोटी असून त्याचा $\frac{3}{4}$ भाग राजाधिराज पांचवे जार्ज बादशहा यांच्या आधिपत्याखालीं आहे. उरलेला $\frac{1}{4}$ भाग येथील हिंदी राजेरजवाड्यांच्या ताब्यांत असून त्याचेंहि आधिपत्य इंग्रजांकडेच आहे.

**तीन विभाग**—भारतवर्षाचे साधारणपणें तीन विभाग करतां येतील. (१)पूर्वपश्चिम पसरलेला पर्वतविभाग.(२)उत्तर हिंदुस्थान.(३)दक्षिण हिंदुस्थान. यांतील पहिला विभाग दोन हजार मैल लांब असून, दोनशें ते पांचशें मैल रुंद आहे. जगांतील सर्वांत उच्च भागांपैकीं हा एक भाग असून यांतील शिखरें गगनचुंबनाकरिता किंवा मेघबंधूंशीं गुजगोष्टी करण्याकरितांच कीं काय उत्कंठेनें २९००० फूट उंच गेलीं आहेत. याचा बराचसा भाग नेहमीं हिमाच्छादित असतो. या भागाची उंची सर्वत्र सारखी आहे, अगर दोन हजार मैलपर्यंत ही एक अखंडच्या अखंड पर्वतमाला पसरली आहे असें नाहीं. कोठें कोठें दोन पहाडामध्यें बिकट खोल वाटा आहेत; त्यांना घाट म्हणतात. यांतूनच वाट काढून परकीयांनीं हिंदुस्थानांत आपले पाय पसरले आहेत. मंगोल, युनानी, इराणी, शक, पठाण, तुर्क, मोंगल वगैरे लोकांच्या टोळ्यांच्या टोळ्या या घाटांतून येत असत व याच मार्गांनीं देशदेशांतराचे लोक प्राचीन काळापासून हिंदुस्थानाशीं व्यापार करीत आले आहेत.

| ईशान्येकडील घाट | पासून | पर्यंत | पश्चिमेचे घांट | पासून | पर्यंत |
|---|---|---|---|---|---|
| कन्द्रीबल | काश्मीर | लेह | खैबर | पेशावर | काबूल |
| काराकोरम् | लेह | यार्कंद | कुरम | सिंधु | काबूल |
| गंगतंग | श्रीनगर | चवरंग | खुर्द काबूल | ,, | ,, |
| मस्तंग | नेपाळ | तिबेट | गोमल | गोमल | कंधार |
| लचन आणि लचुंग | दार्जिलिंग | लासा | बोलान | शिकारपूर | क्केट्टा |

**उत्तर हिंदुस्थानः**—काश्मीर ते विंध्याचल, व गुजराथ ते ब्रह्मदेश यांमधील प्रदेशास उत्तर हिंदुस्थान म्हणतात. यामध्यें काश्मीर, पंजाब, सिंध, संयुक्तप्रांत, राजपुताना, गुजराथ, बंगाल आणि आसाम यांचा समावेश होतो. हा भाग सर्वांत अधिक सुपीक आणि समृद्ध, दाट

वस्तीचा, तसाच इतिहासप्रसिद्ध आहे. सिंधू, गंगा, ब्रह्मपुत्रा आणि महानदी या मोठ्या नद्या व त्यांना मिळणाऱ्या इतर लहान नद्या यामुळें हा प्रांत सुपीक झाला आहे. तसेंच वेळोवेळीं काढलेल्या कालव्यांच्या योगानें तर या नद्यांची जलसेचन शक्ति चांगलीच वाढली आहे. पंजाबांत ९५०००००, व संयुक्तप्रांतांत ३०००० एकर जमिनीवर कालव्याच्या सहाय्यानें पाणी पुरविलें जातें.

दक्षिण हिंदुस्थानाला साधारणपणे दक्षिण या मोघम नांवानें संबोधतात. याच्या उत्तरेस सातपुडा आणि विंध्य हे पर्वत असून हा भाग म्हणजे कन्याकुमारीपर्यंत पसरलेलें त्रिकोणाकृति द्वीपकल्पच आहे.

बंगालच्या उपसागराकडील किनाऱ्यास कोरोमंडल आणि पश्चिमेकडच्या किनाऱ्यास मलबार म्हणतात. हा प्रदेश पर्वतप्राय असला तरी पर्वतांची उंची साधारण कमीच आहे. नर्मदा, तापी, गोदावरी, कृष्णा, कावेरी इत्यादि नद्या यांतून वहात असून येथें उद्भिज्ज व खनिज संपत्तीही विपुल आहे.

३ समुद्र किनाऱ्याचें महत्वः—हिंदुस्थानचा किनारा प्रायः सरळ, अदंतुर असून त्यांत फारशा खाड्या नाहींत. यामुळें जहाजें सुरक्षित रहात नाहींत. शेकडों नद्यांतून वाहून आलेली रेती समुद्रांत पडल्यानें किनाऱ्याजवळ खोल पाणी नाहीं. म्हणून मोठीं जहाजें किनाऱ्याजवळ चांगलींशीं येऊं शकत नाहींत. अर्थात् उत्कृष्ट बंदरांची संख्या कमी आहे.

हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हिंदुस्थानच्या किनाऱ्याची लांबी ३६०० मैलांपेक्षां अधिक आहे. एवढ्या मोठ्या किनाऱ्याचें रक्षण करणें हें कार्य सुगम नव्हतें. मुसलमान बादशहांनीं मोठमोठीं शहरें वसविलीं तीं फार दूरवर आंत असून राज्यासंबंधींच्या उलाढाली तेथें होत असत; परंतु किनाऱ्यावर पहावें तों तेथें अरबस्थान व आफ्रिकेचे मुसलमान केव्हां केव्हां लुटालूट करीत असत. इसवी सन १५०० पासून या देशाच्या इतिहासांत एक अद्भुत परिवर्तन होऊं लागलें. त्यावेळीं पोर्तुगालसारख्या छोट्या देशाचे मूठभर लोक

हजारों मैलावरून जलमार्गानें इकडे येऊन लुटालूट करून आपल्या देशा-कडे वैभव व विजय ओढूं लागले होते. यापुढें पोर्चुगालचा कित्ता हॉलंड, फ्रान्स आणि इंग्लंड येथील लोक गिरवूं लागले आणि येथें येऊन येथील राजांशीं यथाप्रसंग सामदामदंडप्रयोग करूं लागले. हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर त्यांच्या व्यापाराची चलती होती. तराजूच्या मागोमाग राज्य-विस्ताराचेंही कार्य जारीनें सुरूं होतें. समुद्रांतून सैन्य आणावयाचें आणि येथील मुलखाचें आक्रमण करीत रहावयाचें हा क्रम सुरूं झाला. सारा हिंदुस्थान देश इंग्रजांच्या ताब्यांत गेला व आज आहे तो त्यांच्या उत्कृष्ट लष्करी व आरमारी सामर्थ्यामुळें होय.

४ भारतवर्षाचें महत्वः—

१ सुपीक जमीन, अमूल्य खनिज-संपत्ति, दुर्गम, अभेद्य व अत्युच्च पर्वतांचे तट, दुस्तर महासागराचे खंदक आणि असंख्य लोकसंख्या या कारणामुळें आशियाखंडांत भारतवर्ष हा एक अद्वितीय देश आहे.

२ हा देश इतका विस्तीर्ण आहे कीं, याचे राष्ट्रीय संबंध इराण, टर्की, रशिया, चीन, फ्रान्स इत्यादि राष्ट्रांबरोबर आहेत आणि एकीकडे आफ्रिका व दुसरीकडे आस्ट्रेलिया या इंग्रजी वसतीच्या मध्यें असलेल्या हिंदी महासागराचा हा देश अधिपति आहे.

३ यांतील कच्चा व पक्का माल दूरदूरच्या खंडावर विक्रीकरितां जात असून या देशांत उत्पन्न झालेल्या पदार्थांविणें सुधारलेल्या जगाला धक्का बसूं शकतो.

४ याच कारणामुळें दूरदूरचे लोक स्पृहणीय सुवर्णभूमीचा हेवा मानून इकडे आले आहेत आणि या देशाला लुबाडण्याचे व जिंकण्याचे प्रयत्न करीत आले आहेत. हल्लीं हा देश इंग्रजी साम्राज्याच्या राजमुकुटांतील एक अत्यंत तेजस्वी रत्न आहे.

**५ स्वाभाविक परिस्थितीचा भारतवासियांवर परिणाम.**

**( १ ) जमीन विशेष सुपीक असल्यानें, अन्न मिळविण्याकरतां लोकांना कमी कष्ट पडतात, यामुळें आराम आणि चैन याकडे फाजील प्रवृत्ति आहे. परदेशीय लोकांना येथें उद्योगाकरतां येण्याला हें एक आकर्षण असून**

यामुळें हिंदुस्तानचे परदेशांशीं व्यापारी संबंध विशेष जडले आहेत.

( २ ) देश अति विस्तीर्ण असल्यानें, या देशांत थोडें फार आक्रमण केलेल्या निरनिराळया जातींना आपआपले व्यक्तिनिष्ठ स्वरूप व वैशिष्ट्य राखून ' सवते ' राहण्यास अवसर मिळाला. एकराष्ट्रीय भावना व ती-मुळें विविध जाती एकजीव करण्याची कल्पना क्वचितच येई.

( ३ ) देशांत अनेक दुर्गम पर्वत व दुस्तर वाळवंटें असल्यानें भिन्न-भिन्न जातींचें एकीकरण होणें कठीण झालें आणि पहाडांतील व राजपुतान्यांतील लोक स्वाऱ्या करणाऱ्या शत्रूशीं अनेक वर्षें शौर्यानें लढून स्वतंत्र राहूं शकले.

( ४ ) मोठमोठ्या सामर्थ्यवान् वीर्यशाली जाती येथे अधिक काल राहिल्यानें चैनी बनून क्षीण झाल्या, आर्य, पठाण आणि मोंगल या सर्वांची ही अवस्था झाली आणि कालचर पक्षांप्रमाणें येथें कांहीं काल राहून फिरून आपल्या देशांत जाऊन राहण्याची पद्धत सोडल्यास इंग्रजांचीहि अवस्था तीच होणार आहे.

६ हिंदुस्थानांतील सध्यांचे मानव वंश.

आज अखिल हिंदुस्थानावर दृष्टि फिरविली तर हा देश नाना जातींचें, नाना भाषांचें, नाना रीतिरिवाजांचें संमेलनच बनून राहिलेला दिसतो. सध्यां येथे सात मुख्य वंशांची वस्ती पुढील कोष्टकांत वर्णन केल्याप्रमाणें आहे.

या सर्व जातींचें मूळ धर्म, आचार, भाषा व संस्कृति आज लुप्तप्राय झाल्या आहेत. त्यांनीं या देशाचे आचार, या देशाची भाषा व या देशाचीच संस्कृति स्वीकारल्यामुळें त्या सर्व आज हिंदुधर्माशीं एकजीव झाल्या आहेत. या गोष्टविरून या धर्माचें सामर्थ्य व विशालपणा प्रतीत होतो.

७ आर्यांचें वसतिस्थानः साऱ्या हिंदुस्थानांत केवळ काश्मीर, पंजाब, राजपुताना या प्रांतांतच आर्यांची वसती आहे. इतरत्र देशभर आर्य लोक येथें येण्यापूर्वी ज्या जाति होत्या त्याच आजपर्यंत रहात आहेत. तसेंच वेळोवेळीं हा देश पादाक्रांत करून येथें स्थायिक राहिलेले लोकही त्यांत आहेत. पुढील कोष्टकावरून हिंदुस्थानांतील सध्यांच्या मुख्य वंशांची व त्यांच्या वसतिस्थानांची कल्पना येईल.

| वंश | स्थान. | पोटजाती. |
|---|---|---|
| १ मूळ अनार्य रानटी. | पश्चिम बंगाल, मध्यप्रांत वऱ्हाड, दक्षिण, अंदमान बेट. | गोंड, खांड, सन्ताळ, भिल्ल, मुंड, बह्लाळ. |
| २ मंगोल. | नेपाळ, भूतान, आसाम, बर्मा. | खासी, लिंब, लुशाई, बर्मी. |
| ३ आर्य. | काश्मीर, पंजाब, राजपुताना. | जाट, रजपूत, शीख, काश्मिरी. |
| ४ द्राविड मंगोल. | बंगाल, ओरिसा. | बंगाली, ब्राह्मण, वैद्य बागदी. |
| ५ आर्य द्राविड. | संयुक्त प्रांत, उत्तर बंगाल, ओरिसा. | बभन, चांभार. |
| ६ शक द्राविड. | मुंबई, कूर्ग. | देश.ब्राह्मण,मराठा,प्रभू. |
| ७ तुर्क इराणी. | बलुचिस्थान, पंजाबच्या वायव्य सरहद्दीवरचा प्रांत. | बलोच, ब्रहूई, मर्रिस. |

वस्तुतः आजमितीस या देशांत सुमारें ४३ जाति आणि २३७८ पोटजाति आहेत.

८ **भिन्न धर्म आणि भाषा**—परदेशीयांची हिंदुस्थानांतील आक्रमणें विशाल कालखंडानें विभागलेली. तसेंच हीं आक्रमणें करणाऱ्या व वसाहती स्थापणाऱ्या टोळ्याही भिन्न भिन्न देशांच्या आणि जातींच्या. तेव्हां त्यांचा धर्म तरी एक कसा असावा ? मूळचे एतद्देशीय लोक भुताखेतांची आणि प्रेतपिशाचांची उपासना करीत. आर्य लोक वैदिक धर्माचे अनुयायी. त्यांतही पुन्हा बौद्ध आणि जैन मतांचा प्रादुर्भाव. शिवाय इ.स.च्या ११ शतकापासून मुसलमानी धर्माचा फैलाव आणि १६ व्या शतकापासून यांतच खिस्ती धर्माचो भर. धर्म भिन्न; त्याबरोबरच भाषाहि भिन्न. अशा स्थितींत आज येथील भाषांची संख्या १५० पर्यंत असावी व त्यांच्या लिप्यांचे प्रकार तिसापर्यंत असावेत यांत आश्चर्य नाहीं.

परंतु याबरोबरच हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, एवढ्या वैचित्र्याच्या बुडाशीं एकसूत्रीपणा आहे. मुख्य भाषा अशा येथें सहाच आहेत. हिंदी, बंगाली, मराठी, गुजराथी व तामीळ आणि कानडी. यांतही निकट संबंध आहेत. तसेंच मुख्य धर्मही तीनच आहेत. हिंदु, मुसलमान आणि खिस्ती. ही स्थिति युरोप खंडाच्या स्थितीपेक्षां खास वाईट नाहीं. रशिया वगळल्यास युरोप आणि हिंदुस्थान सारखेंच आहे. पण एका ऑस्ट्रियांतच चौदा भाषा आहेत.

९ **भारतीय इतिहास**–आतां प्रश्न असा आहे कीं, ज्या जातींनीं अगर लोकांनीं हिंदुस्थानांत येऊन वसाहती केल्या त्या येथें केव्हां व कोठून आल्या ? नंतर, एकीचा दुसरीवर काय परिणाम झाला ? निरनिराळ्या काळच्या त्यांच्या संस्कृतींचीं कोणतीं चिन्हें अगर अवशेष सांपडतात ? निरनिराळ्या वेळीं त्यांची धार्मिक स्थिति कशी होती ? तसेंच त्यांचे व परदेशांचे संबंध कसे होते ?

या प्रश्नांच्या उत्तरांत सर्व हिंदुस्थानच्या इतिहासाचा समावेश होतो.

१० **मूळचे एतद्देशीय रहिवाशीः**-विद्वानांचें मत असें आहे कीं, येथें आर्य येण्यापूर्वीं दोन जातींची वसती होती. त्या कोल आणि द्रवीड होत. हे दोन लोक येथील अगदीं पहिले रहिवाशी. पूर्व आणि मध्य हिंदुस्थानांत कोल असून द्रवीड साऱ्या हिंदुस्थानभर पसरले होते.

अगदीं अज्ञात अशा प्राचीन काळीं या दोनहि जाती अगदीं रानटी होत्या. लाखों वर्षांपूर्वीं ते केवळ दगडांचीं हत्यारें, पाषाणायुधें वापरीत. दऱ्यागुहांत रहात. मृगया करून आपलें रक्षण करीत व योगक्षेम चालवीत. कांहीं हजार वर्षें गेल्यानंतर तांब्याच्या हत्यारांचा उपयोग करावयास ते शिकले व असेंच हळू हळू सुधारणेच्या मार्गाला लागले. आर्य लोकांनीं त्यांना उत्तरेंतून हाकून लावलें तथापि दक्षिणेकडे जाऊन त्यांनीं आर्यांच्या मदतीनें व कांहींशा अनुकरणानें आपल्यांत प्रशंसनीय सुधारणा घडवून आणली. अर्थात् अजूनहि दऱ्याखोऱ्यांत दडून रहून काळ कंठणारे भयंकर रानटी लोक आहेतच.

११ द्रविडः--यांना शांतता, धैर्य आणि उद्योग यांची आवड होती. लढाईचा त्यांना कंटाळा असे. कोल लोकांपेक्षां यांची लोकसंख्या अधिक असून सुधारणा वरच्या दर्जाची होती. ते शेतकीमध्यें अधिक हुशार होते. कमींत कमी पांच हजार वर्षांपूर्वीच त्यांनीं गांवें व शहरें वसविलीं असून त्यांच्यामध्यें राजे, महाराजे यांच्या नेतृत्वाखालीं सुधारलेली राज्य-पद्धति व राजनीति असे. त्यांचा व्यापारहि दूरवर असे. कालिकत, कीलान, सुरत, भडोच, पाटाल इत्यादि बंदरांतून दक्षिणेंतील नानाप्रकारच्या वस्तू घेऊन दूरदूरच्या देशीं जाऊन ते विकत असत. प्रेतपिशाचांच्या भजनीं न लागता, ते पृथ्वीलाच माता समजून तिची पूजा करीत व तिजबरोबरच पाषाण, वृक्ष, सर्प, सूर्य यांचीहि आराधना करीत. या विविध प्रकारच्या पूजा आधुनिक पौराणिक हिंदुधर्मामध्यें शिरून राहिलेल्या आहेत.

मंगोली आणि आर्य लोकांनीं द्रवीड लोकांचा मोठा पराभव करून त्यांना बहुतेक साऱ्या उत्तरेंतून दक्षिणेंत हांकलून दिलें. तेव्हां ते दक्षिणेत येऊन राहिले. हजारों वर्षांनीं आर्यांचा त्यांजवर पगडा बसून त्यांनीं आर्य संस्कृतीचें ग्रहण केलें. पण त्यांनीं आपली संस्कृति सर्वस्वी सोडली नाहीं. यामुळेंच आजहि द्राविडामध्यें स्वतंत्र विचार, आचार, रीतिभाति आणि भाषा दिसून येतात. सध्यां दक्षिणेंत ६० लाख द्रवीड असून ते कमींत कमी १४ भाषा बोलतात. यांपैकीं तामिल, तेलगू, कानडी आणि मल्याळम् प्रसिद्ध होत. मद्रास इलाख्यांत द्राविडांचीच संख्या अधिक आहे.

१२ इतिहासाचा ओघ— आर्य लोक येथें आल्यापासून आजपर्यंत हिंदुस्थानच्या इतिहासाचे चार मोठे भाग पडतात.

१ आर्यकाल—इतिहासपूर्व अज्ञात कालापासून इ. स. १२०० पर्यंत यांत ५ विभाग आहेत. वैदिक, याज्ञिक, दार्शनिक अगर आर्ष, बौद्ध ( ६०० खि. पू. –५०० इ.स. ), पौराणिक ( ५००–१२०० इ.स. )

२ मुसलमानी काल—इ. स. १२०० ते १७७०, दहाव्या

शतकापासून एकंदरींत या मंडळीच्या स्वाऱ्या व टोळ्या इकडे विशेष येऊं लागल्या, परंतु त्यांचे बेत सुमारें १२०० मध्यें सफल झाले.

या कालाचे दोन विभाग पडतात.

(क) पठाण काल-( १२०६-१५२६ ) हिंदुस्थानांतील पहिला विजय पठाणांनीं १२०० मध्यें संपादिला आणि एक शतकानंतर दक्षिणेंतहि त्यांनीं प्रवेश केला.

(ख) मोंगल काल- ( १५२६-१७७० ) १६ व्या शतकामध्यें मोंगल वंशाची सुरवात झाली. यानें कांहीं कालपर्यंत हिंदुस्थानांत एकछत्री साम्राज्य उपभोगिलें.

३ हिंदु जागृति ( १६४०-१८०४ ) या काळीं मराठे आणि शीख यांनीं हिंदुस्थानांतील बहुतेक राज्यें पादाक्रांत केलीं. परंतु त्यांचें राज्य स्थिर राहिलें नाहीं.

४ इंग्रजी काल ( १८०० पासून पुढें ) १६व्या शतकांत युरोपियनांनीं हिंदुस्थानांत राज्य कमविण्याचें योजिलें. व अखेर इंग्रजांनीं जिंकलीं व त्यांच्याच छत्राखालीं आपण आज आहोंत.

---

## प्रकरण २ रें



## प्राचीन भारतवर्षाच्या इतिहासाचीं साधनें.

१ अति प्राचीन पुस्तकांचा लोप—भारत वर्षाचा पुरातन इतिहास अंधारांत दडून राहण्याचें कारण हें कीं, खि.स.पू. सहाशें वर्षांपूर्वीचा इतिहास सांगणारीं विश्वासजनक दृढप्रमाणें आज उपलब्ध नाहींत. परंतु यामुळें नाउमेद होऊन स्वस्थ बसतां येत नाहीं. या इतिहासाचें ज्ञान तर अवश्यक आहे. तेव्हां त्याच्या संशोधनार्थ, धर्मशील भारतवर्षीयांनीं तनमनधनेंकरून

अद्याप सुरक्षित ठेवलेल्या आमच्या प्राचीन धर्मग्रंथांना शरण गेल्या शिवाय गत्यंतर नाहीं. खि.स. पू. ६००पासून बौद्धकालाचा आरंभ. याच्याहिपूर्वी प्राचीन आर्यांनीं हजारों ग्रंथ रचिले. यापैकीं बहुतेक आज लुप्तप्राय असले तरी सगळ्या विघ्नांतून आणि दिव्यांतून वाचलेले असे अनेक ग्रंथ आज हि उपलब्ध आहेत. यांपैकीं मुख्य मुख्य पुढें दिले असून यांच्याच सहाय्यानें आपला प्राचीन इतिहास लिहिणें शक्य होत आहे.

२ इतिहासावर प्रकाश पाडणारे ग्रंथ.

१ चार वेद—ऐतिहासिक संप्रदायानुसार—वेदांना अनादि मानणाऱ्यांच्या मतानुसार नव्हे -ऋक्, यजु, साम, अथर्व.

२ ब्राह्मण—ऐतरेय, तैत्तिरेय, ताण्डय, शतपथ, गोपथ.

३ आरण्यक—ऐतरेय, तैत्तिरेय इ.

४ उपनिषद्—ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडूक्य, ऐतरेय. तैत्तिरेय, छान्दोग्य, बृहदारण्यक, श्वेताश्वेतर, इ. ११० ग्रंथ.

५ श्रौतसूत्र—कात्यायन, लाट्यायन, आश्वलायन, सांख्यायन, इ.

६ गृह्यसूत्र—पराशर, गोभिल, आश्वलायन, आपस्तंब, इ.

७ षट्दर्शन—सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा, वेदान्त.

८ वाल्मीकिरामायण आणि महाभारत १८ पर्वें.

९ व्याकरण, यास्काचें निरुक्त—पाणिनीची अष्टाध्यायी.

३ **वरील साहित्याचें ऐतिहासिक महत्वः**—यांपैकीं रामायण व महाभारत हीं कांहींशीं ऐतिहासिक पुस्तकें आहेत. परंतु यांच्यांत वेळोवेळीं भर पडत गेल्यानें यामध्यें एकाच विशिष्ट कालाचा निश्चित इतिहास सांपडत नाहीं. हजारों वर्षांतील ऐतिहासिक गोष्टी आणि दंतकथा यांची सरमिसळ झाल्यानें त्यांचें ऐतिहासिक महत्व कमी झालें आहे. व्याकरण सोडल्यास बाकीचे सारे ग्रंथ धार्मिकच आहेत. त्यावरून लोकांची राहणी, विधि, चालीरीति, पूजापाठ, यज्ञ वगैरे करण्याच्या रीति, त्यांची आर्थिक, सामाजिक, मानसिक व अध्यात्मिक इ. स्थिति समजून येतात. आजकाल राजवंशाचा उत्कर्ष आणि अपकर्ष, तसेंच राजांच्या दरबारांचें वर्णन देणें एवढेंच इतिहासकारांचें कर्तव्य समजलें जातें. पण खऱ्या इतिहासाचा हा

एक केवळ छोटा भाग झाला. इतिहासाचा मुख्य भाग म्हणजे प्रजेच्या स्थितीचें सर्वांगीण अवलोकन. भारतीय धर्मग्रंथावरून ही सर्वांगीण माहिती मिळते. परंतु यांत दोन मोठ्या अडचणी आहेत.

१ पहिली ही कीं, या ग्रंथांचा काल कोणालाही अचुक सांगता येत नाहीं. याकरितां एका विशिष्ट ग्रंथामधील वर्णन बरोबर कोणत्या कालच्या-समाजाचें आहे हें समजत नाहीं.

२ प्रत्येक पुस्तकांत वेळोवेळीं भर पडून त्यांच्या निरनिराळ्या आवृत्त्या झाल्या आहेत. तेव्हां त्यांतील वृत्तान्त किती शतकांचा आहे हें सांगणें कठीण आहे.

४ बौद्ध आणि पौराणिक कालांच्या इतिहासाचीं साधनें:—हा इतिहास लिहिणें तितकें कठीण नाहीं. कारण यासंबंधीं पुष्कळ साधनें उपलब्ध आहेत. अर्थात् आज अनेक दृष्टींनीं तीं अपूर्ण आहेत तरी सामान्य इतिहास लिहिण्यास सर्वसाधारणपणें तीं पुरेशीं आहेत.

१ वंशावळी–वंशवृक्ष तयार करून ठेवण्याची महत्वाकांक्षा राजेरजवाड्यापासून तों साधारण मनुष्यापर्यंत आर्यवंशांत अद्याप दिसते. पुरातन कालीं वंशावळी लिहिल्या जात असत, आणि शतकेंच्या शतकें त्या तोंडपाठ ठेवल्या जात. हिंदुस्थानांत अलीकडे एक भूर्जपत्र सांपडलें आहे. त्यावरील लेख कमींत कमी १४०० वर्षांपूर्वीं तरी लिहिला असावा. यासारखे अनेक पत्रलेख जमिनींमध्यें गाडलेले असले पाहिजेत. हे सर्व उकरून काढणें अवश्य आहे.

पुराणांतील राजवंशावळी, त्याप्रमाणेंच नेपाळ व ओरीसा प्रांतांतील राजवंशावळ्या आजपर्यंत प्रसिद्ध आहेत. परंतु त्यांतील प्राचीन राजांचे उल्लेख विशेष चुकीचे वाटतात. याकरितां त्यांचा उपयोग जरा विचारपूर्वकच केला पाहिजे.

२ निळीं पुस्तकें–( नीलपत्रिका ) लिहिण्याची पद्धत पूर्वीपासूनच भारतवर्षांत चालू होती. हल्लींहि Blue Books मध्यें इंग्रज सरकार राज्यविषयक माहिती छापत असतें. प्राचीन इतिहासाकरितां या नीलपत्रिकांचेंही संशोधन होणें अवश्य आहे.

३ वंशेतिहासहि पूर्वी लिहित असत. यामध्यें निळया पुस्तकांतील हकीगतीवरून राजकीय शासनवृत्तांत देत असत. असल्या इतिहासाचें एक प्रकरण ओरिसा प्रांतांतील हाथी गुफ्फा [ खि स. पू. १५५ ] च्या भिंतीवर लिहिलें आहे.

४ राजतरंगिणी—कल्हण पंडितानें लिहिलेल्या या पुस्तकांत काश्मीरचा छानदार इतिहास सांपडतो. अर्वाचीन काश्मीरचा इतिहास फार मनोरंजक आहे, परंतु काल बरोबर ठरवितां येत नसल्यानें विश्वसनीय असा प्राचीन इतिहास मिळत नाहीं.

५ प्राचीन नगरांचा शोध—अनेक कारणांमुळें प्राचीन नगरें मातींत मुजून गेलीं आहेत. आजपर्यंत अशीं अनेक ठिकाणें खोदून काढल्यानें बहुमोल ऐतिहासिक पुरावा उपलब्ध झाला आहे. सिंधमध्ये मोहन-जादोरा, माँट गोमरीजवळ हरप्पा, बनारसजवळ शारनाथ, तक्षशिला, पेशावर, पाटलीपुत्र, अंधेरी, कोल्हापूर, इलोरा, अजंटा, कण्हेरी इत्यादि ठिकाणीं झालेल्या खोदकामानें भारतीय इतिहासावर पुष्कळच प्रकाश पाडला आहे.

६ धातुलेख आणि नाणीं—१ लोखंड, तांबें, जस्त, पितळ, सोनें, चांदी, इ. धातूंचीं नाणीं. २ भिन्न भिन्न प्रकारच्या दगडामातीचीं पक्कीं भाजलेलीं भांडीं. ३ तांबें, लांकूड आणि कांतडें यांच्या तुकड्यावर लिहिलेलीं राजांचीं आज्ञापत्रें व सनदा वगैरे खोदकामांत सांपडल्या. त्यांचीहि कांहीं मदत होते.

७ शिलालेख—गुहा, दऱ्या, दगड, खांब, स्तूप, पुतळे, देवळाच्या भिंती वगैरेवर राजांनीं खोदविलेले अनेक लेख सांपडले आहेत ते सर्व अमोलिक आहेत.

८ परदेशीय प्रवासी--यांच्या लेखांचीही फार मदत होते. यांमध्यें मेग्यॅस्थेनीस, फा हीन, ह्यून सांग, अल्बेरुनी आज प्रसिद्ध आहेत. वरील साधनाभावीं बौद्ध व पौराणिक कालाचा इतिहास रचणें अशक्य होतें.

९ परदेशीय साहित्य—भारतवर्षाचे व्यापारीसंबंध इराण, टर्की, चीन, जपान, तिबेट, अरब, मिसर, ग्रीस, रोम, इत्यादि देशांशीं असल्यानें त्या

त्या देशांच्या प्राचीन इतिहासाच्या परिशीलनानें भारतीय इतिहासावर बराच प्रकाश पडेल.

१० भारतीय साहित्य—बौद्ध, जैन आणि पौराणिक धर्मांचें वाङ्मय, वैद्यक, शिल्प, नीति, तर्क, ज्योतिष वगैरे शास्त्रांवरील ग्रंथ यांचें अलोट सहाय्य होत आहे. हिंदुलोक संस्कृत, तामिल आणि पाली या भाषांचा विशेष अभ्यास करीत नसल्यानें त्यांना त्यांतील ग्रंथ रत्नांना मुकावें लागत आहे ही दुःखाची गोष्ट आहे.

५ उपरिनिर्दिष्ट ऐतिहासिक साधनावरून स्पष्ट होतें कीं, आर्य लोक आपला इतिहास निःसंशय लिहीत होते. याला प्रमाणें:-

( १ ) इति + ह + आस (या प्रमाणें घडलें) या शब्दाची व्युत्पत्ति. यथार्थपणें लिहून एकसूत्र करण्याची विद्या म्हणजे इतिहास. ( २ ) वेद, ब्राह्मण, उपनिषदें. गृह्यसूत्र, महाभाष्य, महाभारत आणि इतर लौकिक वाङ्मय या सर्वांमध्यें इतिहासाचा मोठा महिमा गायिला असून त्याला प्रत्यक्ष पांचवा वेद म्हणून गणलें आहे. ब्रह्मचारी त्याचें अध्ययन करीत, राजपुत्र त्याचें श्रवण करीत. एवढेंच नव्हे तर तो एक धर्मार्थकाममोक्षाचें साधन समजला जात असे. इतकीं स्पष्ट प्रमाणें असूनही जर कोणी पूर्वी इतिहासच नव्हता असें म्हणेल तर ती त्याची सर्वथा चूक आहे.

६ यावर असा प्रश्न उपस्थित होतो कीं, मग आर्यांनीं लिहिलेलीं ऐतिहासिक पुस्तकें कां सांपडत नाहींत ? याला मुख्य कारणें अशीं—

(१) हिंदूंचे अत्याचार-पुराण मतानुयायी हिंदूंनीं बौद्धांना आणि जैनांना हद्दपार केलें, त्यांचे हाल हाल केले, त्यांचीं पवित्र स्थानें भ्रष्ट केलीं, मूर्ति फोडल्या. याबरोबरच त्यांच्या कांहीं ग्रंथांचाही नाश झाला असला पाहिजे. आणि यांत कांहीं इतिहास ग्रंथ असले पाहिजेत.

(२) आर्यकुल अत्यंत प्राचीन असल्यानें त्यांत शेंकडों क्रांत्या झाल्या असल्या पाहिजेत व यामध्यें अनेक पुस्तकाचा लोप होणें साहजिक आहे. धर्म-कर्माचीं पुस्तकें अत्यवश्यक म्हणून कशींतरी सुरक्षित ठेविलीं जात. पण इतर पुस्तकें अर्थात् इतक्या काळजीपूर्वक रीतीनें राहूं शकलीं नाहींत.

(३) मुसलमानांचा अत्याचार—यांनीं हजारों आर्यमंदिरें आणि पाठशाळा पाडल्या, लुटल्या, जाळल्या आणि पुस्तकांचे गठ्ठेच्या गठ्ठे भस्मसात् करून टाकले. अशा स्थितींत राजाज्ञेविरुद्धहि प्राणाहून प्रिय असे कांहीं थोडे धर्मग्रंथ आर्यांनीं राखले. तेच आम्हांस पाहण्यास मिळतात.

धनुर्वेद, आयुर्वेद, अर्थवेद, ११०० वैदिक शाखा, इतिहास आणि चौसष्ट कला, त्याप्रमाणें राजनीति, ज्योतिःशास्त्र यावरील सहस्रावधि पुस्तकें अशी भारत वर्षाची अमूल्य साहित्य संपत्ति आज लुप्त झाली आहे शंकराचार्य, माधवाचार्य, अब्धुल फाजल आणि १९ व्या शतकामधील आंग्ल लेखक यांच्या पुस्तकांत ज्या अनेक संस्कृत पुस्तकांचा निर्देश आहे त्यांपैकीं कांहींचा तर अजूनहि अगदींच पत्ता लागत नाहीं.

(४) पाद्री लोकांनींहि प्रथम प्रथम अनेक पुस्तकांना जलसमाधि, अगर अग्नि देऊन त्यांचा सत्यानाश केला आहे. आर्यांचा धर्म बुडविल्यानें आपल्या धर्माचा ते स्वीकार करतील अशी त्यांची समजूत असल्यास न कळे !

(५) पण सर्वांत मुख्य कारण भारतवर्षांतील हवापाणी, कृमिकटिक, पूर, आगी, कच्ची घरें आणि दारिद्र्य होय. यांच्यापुढें पुस्तकें चिरकाल सुरक्षित राहूं शकत नाहींत.

---

# प्रकरण ३ रें.

## वैदिक काल.



१ ऋग्वेद हा सर्वांत प्राचीन वेद असें पाश्चात्य विद्वान् समजतात. विल्सन, मॅक्समुलर, ग्रिफिथ हे त्याचा काल खि. पू. १५००–२००० मानितात. प्रो. जाकोबीच्या मतें, तो खि. पू. ४००० आहे. टिळक त्याला खि. पू ३००० पासून ५००० पर्यंत नेऊन भिडवितात. अली-

कडे त्यांचेंच मत अधिकाधिक ग्राह्य होऊं लागलें आहे. प्राचीनतम संस्कृतीचें जन्मस्थान भारतवर्ष हेंच असून इतर संस्कृतींचाहि उगम बहुधा येथूनच झाला असावा. हिंदुशास्त्रांवरून आर्य संस्कृतीचें प्राचीनत्व सिद्ध होत असून अलीकडे संशोधन झालेल्या मोहन जो दारो आणि हराप्पा येथील खोदकामावरून ह्याच सिद्धांतास बळकटी येते. प्राचीन असीरियामध्यें अग्नि, मित्र, अश्विनीकुमार इत्यादि वैदिक देवतांची पूजा ख्रि. पू. १४०० मध्यें प्रचलित होती. यावरूनहि भारत वर्षाचा इतिहास त्याच्याहि पूर्वीच्या अशा इतिहासपूर्वकालापासून सुरू झालेला आहे असें सिद्ध होतें.

उत्क्रांतितत्त्वानुसार भारत वर्षाची वाढ होतां होतां, येथील प्राचीन ऋषिगण वेदांत दिसून येणाऱ्या उच्च संस्कृतीप्रत येऊन पोहोंचला आणि कांहीं शतकांनंतर पृथ्वीच्या पाठीवरील इतर भागांचाहि विकास होऊन मिसर, ग्रीस, इराण वगैरेसारखे देश त्या प्राचीन संस्कृतीचें भागीदार झाले. वेदकालीन संस्कृति बरीच उच्च प्रकारची होती, याची साक्ष पुढें दिलेल्या उदाहरणांवरून व माहितीवरून पटेल.

२ ईश्वरविषयक कल्पना—वेद हे मानव सृष्टीच्या बाल्यावस्थेचें वाङ्मय असल्यानें, त्यांतील देवधर्म, झाडें, नद्या, भूत–पिशाचें वगैरेंची अज्ञपणें पूजा करण्यापलीकडे नाहीं ही समजूत चुकीची आहे. वेदांमध्यें अनेक देवतांच्या प्रार्थना केलेल्या आहेत. पण या देवता एकाच परमात्मतत्वाचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत व मूळ परमेश्वर, सृष्टीचा कर्ता, धर्ता व हर्ता एकच आहे, अशीच वैदिक आर्यांची निश्चित कल्पना वेदांमध्यें सर्वत्र सांपडते. उदा. ‘ विद्वान् लोक परमात्म्याला, इन्द्र, मित्र, वरुण, अग्नि, इत्यादि म्हणतात, व त्याला अग्नि, यम, मातरिश्वा इ. अनेक नांवांनीं संबोधतात.’ ‘ हे अग्नि, हे जातवेद, तूं एकच आहेस.’

एकाच परमेश्वराच्या पूजेप्रमाणें उच्च संस्कृतीच्या द्योतक अशा इतरीह अनेक गोष्टींचे उल्लेख वेदांमध्यें सांपडतात. मूर्तिपूजा, सतीची चाल, भयंकर देवतांची पूजा, जातिभेद, जलपर्यटणनिषेध अगर इतर रानटी गोष्टींचा

मागमूसहि नसतांना वेदांना अडाणी लोकांचीं पुस्तकें म्हणणें केवळ असमंजसपणाचें आहे.

३ भौगोलिक ज्ञान-वेदांमध्यें २५ नद्यांचीं नांवें आलीं आहेत. आर्य लोकांनीं या नांवांची परंपरा हजारों वर्षें चालविली असून आजहि आपल्यामध्यें त्यांतील अनेक नांवें प्रचलित आहेत. उदा. सिंधु, गंगा, यमुना, सरस्वति, शतद्रु, शरयू, गोमती, इ.

४ मुख्य जनपद—वेदांत पुढील जनपदांचे उल्लेख आहेत—गांधार, पुरु, तुर्वश, यदु, अनु, द्रुह्यु, भरत, मागध, अंग इ.

५ आर्थिक स्थिति-यजुर्वेदाच्या ३० व्या अध्यायांत अनेक धंदेवाल्यांचें वर्णन आलें आहे. यावरून असें दिसतें कीं, त्यावेळीं श्रमविभाग, कलाकौशल्य आणि व्यापार हे उन्नत स्थितीप्रत पोहोंचले होते. शेंकडों दगडी व लोखंडी घरें, किल्ले, शतद्वारपुरी इत्यादि पक्क्या भक्कम इमारतींचे उल्लेख आले आहेत. तसेंच हिरे माणकादि रत्नें, पोलाद, शिसें, जस्त, सुवर्णादि धातु, तांदूळ, गहूं, तीळ, हरभरा, उडीद वगैरे धान्यें, गाय, बैल, म्हैस, घोडा, उंट, रंगीबेरंगी हरिणें, कबूतर, कोंबडा, मांजर, सिंह, चित्ता, वानर, अजगर, साप, डांस, माशी, मासा, मगर, मोर, हंस, कावळा, तित्तिर, चक्रवाक, कोकिळ, बुलबुल, वगैरे पशुपक्ष्यांचीं नांवें वेदांत येतात. जनावरें घरीं पाळीत असत. मैनेसारख्या पक्ष्यांना आजच्या सारखेच बोलावयास व गावयास शिकवीत. निरनिराळ्या नौकांचीं वर्णनें अनेकदां आलीं आहेत. एके ठिकाणीं शंभर वल्ह्यांच्या नावेचें वर्णन आहे. याचप्रमाणें ऋग्वेद ( ४–३६ ) मध्यें विमानांचें वर्णन आहे. 'घोडे अगर लगाम या शिवायच एक सुंदर तीनचाकी रथ आकाशांत फिरतो आहे.' त्या वेळचे व्यापारी आजच्याप्रमाणें विमानांतून प्रवास करीत. असें भाष्यकार सायणाच्या टीकेंत ( अथर्व ३-१५-१ ) वाचून आश्चर्य वाटतें. तसेंच पुढील वचन पहा, 'मनोजवानें अंतरिक्षांतील रथ जाऊं द्या.'

६ गायनकलेंतहि प्राचीन ऋषींनीं फार प्रगति केली होती. या विद्येचें उगमस्थान भारतवर्षच होय. ऋग्वेदांत सप्तस्वरांचीं नांवें येतात.

हे स्वर ब्राह्मणांपासून इराणांत, तेथून अरबस्थानांत व तेथून युरोपांत गेले असें वेबर म्हणतो. गानविद्येप्रमाणें गणित व ज्योतिःशास्त्रांतहि वैदिक आर्यांनीं प्रगति केली होती. वेदांमध्यें बेरीज, गुणाकार, भागाकार, परार्धापर्यंत संख्या, इत्यादींचा उल्लेख आला आहे. दशांश अपूर्णांकाचेंहि त्यावेळीं ज्ञान होतें.

७ ज्योतिःशास्त्रांतहि वेदकालीन विद्वान् बरेच पुढें गेले होते. युरोपमध्यें सोळाव्या शतकापर्यंत पृथ्वी गोल असून फिरते या मताचें प्रतिपादन करणाऱ्यास शिक्षा होत असे. गुरुत्वाकर्षणाचा शोध तिकडे प्रथम न्यूटननें लावला, पण वेदांमध्यें आजचीं २८ नक्षत्रें, पृथ्वीचें सूर्याभोंवतीं भ्रमण, गुरुत्वाकर्षणशक्ति, चंद्र स्वप्रकाशित नसून सूर्यकिरणाच्या परिवर्तनांनीं प्रकाशमान् दिसतो, इत्यादि सिद्धांत वगैरे महत्वाचें ज्योतिर्ज्ञान वेदांमध्यें सांपडतें. भारतीय ज्योतिषग्रंथात चंद्रग्रहण व सूर्यग्रहणहि सिद्ध केलें आहे.

८ स्त्रियांची स्थिति—वैदिक काळीं स्त्रिया वेदपठण करीत असत व गुरुकुलामध्यें जाऊन वयाच्या १६ किंवा २४ वर्षांपर्यंत ब्रह्मचारिणी रहात असत. तेथें वेदविद्या आणि गृहव्यवस्थेसंबंधींचें शिक्षण पुरें झाल्यावर त्या तरुणांशीं विवाह करीत. पुरुषांप्रमाणें वैदिक शिकवणुकीचा प्रचार व क्वचित् मंत्ररचनाहि त्या करीत. रोमशा, लोपामुद्रा, सूर्या वगैरे स्त्रियांचीं मंत्रद्रष्ट्या म्हणूनही नांवें आलेलीं आहेत. अनेक मंत्रावरून असें दिसतें कीं, पुरुषांच्या सभांमध्यें सुद्धां स्त्रिया व्याख्यान देत असत, न्यायसभेंत जात असत, व पतीसह रथांतून फिरूनहि येत. याप्रमाणें त्या काळीं स्त्रीस्वातंत्र्य भरपूर होतें, इतकेंच नव्हे तर घराची सर्व व्यवस्था गृहिणीकडेच असून सामाजिक सुधारणेचें मूल कारण स्त्रिया आहेत या विचारानें त्यांना आदरानें व दाक्षिण्यानेंच वागविलें जाई.

९ युद्धसामुग्री—वैदिक आर्य प्रसिद्ध विजिगीषु, लढवय्ये असल्यानें त्यांच्यावेळीं विविध प्रकारचीं आयुधें होतीं हें योग्यच आहे. ते विशेषतः धनुष्यबाणांत फार निष्णात असून त्यांचे तीर अनेक प्रकारचे असत--लोह-

मुखी, विषासक्त, पंखयुक्त, सर्पसमान, सूचीमुख वगैरे. याशिवाय शिप्रा, परशु, शिरस्त्राण, शिसाची गोळी, अंकुश, भिन्नभिन्न प्रकारचीं वज्रें इत्यादींचेहि उल्लेख व वर्णनें आलीं आहेत यांनांच अनेक प्रकारच्या रथांची जोड होती. विद्युद्रथ, चंद्ररथ, चित्ररथ, हिरण्यरथ, वीस उंटांचा रथ, वायुगति किंवा मनोजव रथ इत्यादि उल्लेख अनेक ठिकाणीं येतात. रथिकांबरोबर पायदळहि असून युद्धसमयीं उत्तेजनार्थ वाद्यें वाजवीत. अनेक राजांनीं भाग घेतलेल्या मोठ्या युद्धाचे प्रसंग वर्णिलेले आहेत.

१० **वेदकालीन राज्यसंस्था**—१ राजा, विराट्, महाराट्, स्वराट्, इत्यादि विविध प्रकारचे राजे असत. २ त्यांच्या सहाय्यार्थ भिन्न भिन्न प्रकारच्या व अधिकारांच्या सभा असत. उदा. आमंत्रण, समिति, सभा ग्राम, अरण्य इ. ३ या सभा राजांच्या निवडणुकी करीत. एकसत्ताक पिढिजात राज्याचीहि पद्धत सुरू झाली होती. ४ जरूर प्रसंगीं त्या त्याला पदच्युतहि करीत. ५ पदच्युत झालेला राजा पुन्हा निवडून येणें शक्य असे. ६ बहुमतानें निकाल होत. ७ या सभाच राज्याचे नियम करीत. ८ राजा स्वदेशांतील असावा, असा त्यांचा कटाक्ष असे. ९ प्रत्येकानें राज्यपद मिळविण्याची आकांक्षा धरून यत्न करावा, त्यांत पाप नाहीं असें मत होतें. १० राजे लोक आपआपल्या दर्जाप्रमाणें राजसूय, वाजपेय, अग्निष्टोम, अश्वमेध इ. यज्ञ करीत. ११ भारतीय साम्राज्य हें ध्येय होतें. महाराजाधिराज, राजराज, चक्रवर्ती, एकराट्, विश्वराट्, सार्वभौम इ. बिरुदें धारण केलेले अजमासें शंभर महाराजे प्राचीन भारतवर्षांत होऊन गेले आहेत. यापैकीं मनु, सगर, ययाति, भरत, हरिश्चंद्र, रघु, श्रीराम, चंद्रगुप्त वगैरे लोकप्रसिद्ध आहेत. एका समुद्रगुप्ताचे पराक्रम वाचून युरोपियन लोक त्याला भारतीय नेपोलियन ही पदवी देतात. पण भारतवर्षांत असे शंभरावर नेपोलियन होऊन गेले आहेत कीं, ज्यांनीं देशदेशांतरीं विजयाची ध्वजा फडकवून स्वदेशाचा गौरव, कीर्ति व यश प्रज्वलित करून त्याची संकृति जगभर पसरविली आहे.

---

१ विशेष माहितीकरतां डॉक्टर बालकृष्णकृत वेदोक्त राज्य तथा प्राचीन भारतकी राज्यप्रणाली, अध्याय ६, पहा.

११ सामाजिक परिस्थिति—प्राचीन आर्य लोकांत अनेक सभा होत असत. प्रत्येक सभासदाची–सभ्याची–इच्छा ही असे कीं, आपण दुसऱ्यापेक्षां अधिक चांगला व जोरदार वक्ता व्हावें. आपला काल ते मोठ्या आनदानें घालवीत असत. सुरा आणि सोम प्यावा, नाच, कसरत, जादूचे, गारुड्याचे खेळ पहावेत, बुद्धिबळें खेळावींत, नाना वाद्यांचें वादन ऐकावें, अशा अनेक प्रकारांनीं ते मनोरंजन करीत असत. हा संसार असार आहे असें समजून संन्यास घेणाऱ्या लोकांपैकीं वैदिक आर्य नव्हते, तर ते घोड्यांच्या, रथांच्या शर्यती, नाच, सोंगट्या, वगैरे साधनांनीं आपलें जीवित सुखमय करीत असत. उत्कृष्ट वक्तृत्वकला, व प्रजासत्ताक राज्यपद्धति त्यांनीं संपादिली होती. ते नाना प्रकारचे दागिने कानांत, पायांत, गळ्यांत घालीत असत, सुवासिक पदार्थ वापरीत असत. खाण्याकरितां नानाप्रकारचीं उंचीं पक्वान्नें करीत असत, रंगीबेरंगी लोकरी कपडे मोठ्या हौसेनें घालीत असत. आणि याबरोबरच आपणांस पुत्रपौत्र, धनधान्य, राज्य, साम्राज्य व मोक्ष मिळण्यासाठीं सर्व शक्तिमान् दयाळु परमात्म्याची अग्नि, वरुण, इंद्र, सूर्य, इत्यादि स्वरूपांत पूजा व प्रार्थना करीत; त्यांच्या नांवें विविध प्रकारचे यज्ञ करीत, आणि ईश्वराचें भय बाळगून सत्याचरणानें कालक्रमणा करीत. थोडक्यांत, मायावाद आणि भोगवाद यांतील " सुवर्णमध्य " हीच आर्यांची व वेदांची शिकवण होय.

१२ मोहन–जो–दारो—सिंधमधील एका दरींत एका अति प्राचीन संस्कृतीच्या अवशेषांचा शोध लागला आहे. तेथें एकावर एक अशीं जमिनींत गाडलेलीं तीन शहरें सांपडलीं असून सर्वांत वरचें शहर खि. पू. २५०० मधलें, तर सर्वांत खालचें व प्राचीन शहर खि. पू. ३५०० मधील आहे. मिसर देशांतील स्तंभ आणि खाल्डिआंतील शहर केवळ खि. पू. ३००० वर्षांचें जुने आहेत. पण भारतवर्षांत यापेक्षांहि प्राचीन अशी उपरिनिर्दिष्ट संस्कृति उपलब्ध झाली आहे. मोहन जो-दारोमधील या पुरातन अवशेषावरून तेथें एक उच्च संस्कृति नांदत होती हें निःसंशय ठरतें. त्यावेळीं घरांच्या भिंती भक्कम व उंच होत्या. घरापुढें अंगणें असत. विटा करण्याची कला बरीच पुढें गेली होती. शह-

राच्या स्वच्छतेची व्यवस्था जवळ जवळ आधुनिक पद्धतीचीच होती. रस्त्यांच्या खालून घाण जाण्याकरतां मोठे मोठे नळ घातले होते, असें अवशेषांवरून स्पष्ट दिसतें. या गटारांचा वर्तुळाकार, त्याचें भक्कम काम, उतरतीचें योग्य प्रमाण वगैरे गोष्टी आज प्रत्येक जणाला आश्चर्यचकित करून सोडण्यासारख्या आहेत. तसेंच येथें देवालयें, विहार ( मठ ), राजवाडे, खजिने, धनिकांचीं घरें, हिरेमाणिक व सोन्याचांदीचा सांठा, हार, कण्ठे, भीकबाळया, चित्रें काढलेलीं मातीचीं भांडीं, तांब्याचीं हत्यारें, नाणीं; बैल, घोडे, कुत्रे, बकरीं, मेंढ्या, सिंह, हत्ती, गेंडा वगैरेंचीं चित्रें सांपडलीं आहेत. शिवाय येथें अनेक प्रकारचे पुष्कळसे शिक्केही ( सील ) सांपडले असून त्यांवरून तत्कालीन व्यापाराची भरभराट दिसून येते.

१३ हरप्पा—पंजाबांत, मांटगॉमेरी शहराजवळ जें खोदकाम झालें तेथेंही प्राचीन संस्कृतीचे अनेक महत्वाचे अवशेष सांपडले आहेत. हरप्पाचे अवशेष मोहन-जो दारोचेच समकालीन आहेत. ताम्रयुगाच्या आरंभ-कालींच हें शहर वसलें असावें असा तज्ज्ञांचा अभिप्राय आहे. त्यावेळीं दगडाचे चाकू, बाणाग्र वगैरे जुनीं हत्यारें उपयोगांत होतींच, पण चाकू, फरशा, खुरपीं, कट्यारी, करवत, छिन्न्या वगैरे अनेक तांब्याचीं हत्यारें तेथें सांपडलीं असून, अनेकांची धार पितळी केलेली आढळते. तांब्याच्या भांड्यांत सुरक्षितपणें ठेवलेला कोणा एकाचा हत्यारांचा संग्रह सांपडला असून तो आज ५००० वर्षांनंतरही कामास येण्यासारखा आहे.

---

# प्रकरण चवथें.

## आर्षकाल.



या कालामध्यें रामायण आणि महाभारत या आदि महाकाव्यांवरून व ब्राम्हणादि वैदिक ग्रंथांवरून उपलब्ध होणारा इतिहास येतो. तो स्थूल दृष्ट्या पुढें तीन विभागांत दिला आहे.

१

१ श्रीरामचंद्रापूर्वीचे अयोध्येचे राजे—अयोध्यानगरीचा पहिला राजा इक्ष्वाकु. त्याच्यापासून श्रीरामापर्यंत ३३ राजे होऊन गेले. यांतील प्रसिद्ध प्रसिद्ध नांवें:—त्रिशंकु, मान्धाता, असित, सगर, दिलीप, भगीरथ, रघु, नहुष, अज आणि त्याचा मुलगा दशरथ. इक्ष्वाकु महाराजांनीं रामाच्या अगोदर निदान ३३ × ३० = ९९० वर्षें आपले राज्य स्थापिलें असावें.

२ श्रीरामचंद्राचा काल. २५०० ख्रि. पू.—रामायणांतील नायक श्रीराम याचा काल महाभारतकालापेक्षां निःसंशय अति प्राचीन आहे. विष्णुपुराणांत जी सूर्यवंशी राजांची वंशावळ दिली आहे तिजमध्यें धर्मपुत्र युधिष्ठिरापूर्वीं रामापर्यंत ३९ राजांचा उल्लेख आहे. तेव्हां युधिष्ठिराचा काल ख्रि. पू. १४व्या शतकांत मानला तर श्रीरामाचा काल ख्रि. पू. २५वें शतक मानण्यास हरकत नाहीं. याच न्यायानें सूर्यवंशाचा आरंभ ख्रि. पु. ३६ शें वर्षें झाला, असें ठरतें.

३ श्रीरामचरित्र—मिथिलापुरीचा राजा जनक. त्याला सीता नामक अति सुंदर कन्या होती. ती मोठी झाल्यावर तिच्या विवाहार्थ राजानें स्वयंवर मांडलें. यामध्यें जनकानें आणलेल्या अजस्त्र धनुष्याला बाण लावल्यामुळें श्रीराम विजयी झाला. आणि त्याचा सीतेशीं विवाह झाला. कांहीं वर्षांनंतर दशरथानें लोकसभेच्या अनुमतीनें रामाच्या अभिषेकाची तयारी केली. परंतु कैकेयीच्या आग्रहास्तव रामाला १४ वर्षें वनवासास पाठविणें दशरथाला भाग पडलें. राम, सीता व लक्ष्मण हे चित्रकूट, जनस्थान ( नाशिक ), दण्डकारण्य इत्यादि ठिकाणीं अनेक वर्षें फिरत होते. एकदां राम मृगयेकरितां गेले असतांना, आपल्या बहिणीच्या अपमानाचा व भावाच्या वधाचा सूड उगविण्याकरितां लंकाधिपति रावणानें सीतेस पळविलें. विनंति, लालुच, धमक्या, दटावणी, वगैरे अनेक प्रकारच्या युक्त्यांनीं त्यानें सीतेचें मन वळविण्याचा प्रयत्न केला; परंतु ती पतिव्रता त्याला वश झाली नाहीं. इकडे श्रीराम व लक्ष्मण सीतेच्या शोधार्थ भटकतां भटकतां किष्किंधा वनांत आले. तेथें त्यांनीं सुग्रीव आणि हनुमान यांचा स्नेह संपादन केला व वालिराजाचा वध करून सुग्रीवाला किष्किंधेचें राज्य

दिलें. पुढें त्याच्या सहाय्यानें सीतेचा पत्ता लागल्यामुळें श्रीरामानें लंकेवर चाल केली. घनघोर युद्धानंतर रावण त्याच्या कुलासह मारला गेला. अखेर श्रीरामानें बिभीषणाला त्याच्या राज्यावर बसविलें व सीतेस घेऊन तो अयोध्येस आला.

४ भारताचा पहिला सम्राट्—श्रीरामाचें राज्य म्हणजे साऱ्या भरतखंडाचें एकछत्री साम्राज्य होण्याचा पहिलाच प्रसंग. प्राचीन आर्यांच्या वसाहतींत प्रथमपासूनच अयोध्येचें राज्य सर्वांत मुख्य व जुनें होतें. त्यावेळीं अनेक छोटे छोटे राजे स्वतंत्र रीतीनें राज्य करीत होते. तथापि रावणाचा वध केल्यापासून श्रीरामाला सम्राट ही पदवी मिळाली. दक्षिणेंतील सुग्रीवादिकांचें राज्य त्याच्याच सत्तेखालीं आलें आणि उत्तरेकडील इतर राजांनींहि एवढा बलाढ्य राजा पाहून त्याच्या आधिपत्यास मान्यता दिली असली पाहिजे यांत शंका नाहीं.

५ रामाचे गुण—जगप्रसिद्ध राम, कमलनयन, हंसतमुख व मेघश्याम असा होता. त्याचा स्वभाव सौम्य, मूर्ति मनोहर व बुद्धि तीक्ष्ण असून तो अत्यंत प्रतापी, धीरोदात्त, धर्मशील असा वीर असल्यानें, अखिल मानवजातीला कौतुकास्पद व ललामभूत होऊन राहिला होता. म्हणूनच रामाचें नांव आर्य जातीच्या रोमारोमांत भिनून राहिलें आहे. श्रीरामानें आर्यांचा वंश आणि त्यांची संस्कृति यांचा इतका आश्चर्यकारक रीतीनें प्रसार केला कीं त्या उपकाराची फेड म्हणूनच कीं काय त्यांनीं त्याला अवतारी महापुरुष मानिलें. एवढेंच नव्हे तर, त्याच्या जन्मापासून ३।४ शें वर्षांतच त्याला परमेश्वरी अवतार मानून ते त्याची पूजा करूं लागले. खरोखर रामचरित्र म्हणजे मातृधर्म, पितृधर्म, भ्रातृधर्म, स्त्रीधर्म, मित्रधर्म, राजधर्म आणि युद्धधर्म इत्यादि सर्व धर्मांचा अमूल्य आचरण–संग्रह आहे. ४-४॥ हजार वर्षें लोटलीं, परंतु या महापुरुषाचें यश अजून तळपतच आहे. एवढेंच नव्हे तर प्रत्येक घरामध्यें सीता, राम आणि लक्ष्मण यांचीं नांवें ईशभक्तीनें घेतलीं जात आहेत. प्रातःकाळीं अखिल हिंदु, रामाचें भजन व संकीर्तन करीत आहेत. मेक्सिकोसारख्या ठिकाणीं रामसीतांच्या उत्सव केला जात असे, व दक्षिण अमे-

रिकेंतील पेरू देशाचा राजा कोनकह हा आपणास सूर्यवंशी समजत असून दशाहाराप्रमाणें श्रीरामाचा महोत्सव करीत असे.

६ रामकालीन संस्कृतीचीं उदाहरणें.

अयोध्या, रामाची राजधानी. ही १२ योजनें लांब व ३ योजनें रुंद असून नगरीच्या चौबाजूंच्या दरवाज्यावर आयुधें सज्ज असत. किल्ल्याच्या चारी बाजूस पाण्यानें भरलेले खंदक असत. हिमालय, विंध्याचल वगैरे ठिकाणचे मोठमोठे हत्ती, सिंधु, बाल्हीक, बनायु, कम्बोज, इत्यादि जातींचे घोडे, उंट, खेचर, गाढवें, बैल वगैरे प्राण्यांनीं किल्ले सदा गजबजलेले असत. नगररक्षणाकरतां महारथी तयार. तटावर बड्या बड्या तोफा सज्ज. शस्त्रागारांत शस्त्रांचा भरपूर पुरवठा. यामुळें या नगरीवर हल्ला करण्याची कोणाचीहि छाती नव्हती, आणि अयोध्या हें नांव सार्थ होतें. राजमार्गावर नित्य जलसिंचन होत असे. विविध राजमार्गांवर दुतर्फा सारख्या उंचीचे, सुंदर, सुशोभित व रत्नमय असे वाडे असून त्यांच्या गच्चीवरील निशाणें हवेंत एकसारखीं फडफडत असत.

स्त्रियांकरतां स्वतंत्र क्रीडाभवनें असून त्यांच्याकरतां नाट्यगृहेंहि होतीं. सुंदर वृक्षांनीं व फुलझाडांनीं खेंचलेलीं उद्यानें शहरभर दिसत. पुरुषांच्या सुंदर पोषाकानें नगरीला अतिशय शोभा येत असे. ठिकठिकाणीं नगारे झडत, मृदंगवीणा आणि शंख वाजत. हरतऱ्हेचे व्यापारी आपलीं दुकानें अनेक प्रकारें सजवत. तांदूळ आणि इतर धान्यांनीं जमीन अति समृद्ध. पाणी उंसाच्या रसासारखें गोड. नगरींत चोर, नास्तिक, व्यभिचारी, दरिद्री औषधालाहि नाहीं. मजूरी तर दिवसाला एक सुवर्णमुद्रा. याप्रमाणें अयोध्या नगरी ही एक भूलोकची प्रत्यक्ष अमरावतीच होऊन राहिली होती.

७ लंकाः— आतां रावणाच्या राजधानीचें वर्णन. दक्षिण समुद्रांत ताम्रपर्णी अगर लंका या नांवाचें बेट असून त्याच्या राजधानीचेंहि नांव लंका होतें. त्याच्या चारी बाजूंस समुद्ररूपी खंदक असून राजधानीभोंवतीं वैदूर्यमण्याचीं द्वारें असलेला सोन्याचा तट होता. जिकडे तिकडे शंख,

वीणा, तंबोरा वगैरेंचे मधुर वाद्यघोष; हत्ती घोडे आणि रत्नखचित रथ-पालख्यांनीं रस्ते सदा गजबलेले; नानाप्रकारच्या सुवर्णभूषणांनीं नरनारी नटलेले, हिरेमाणिकांच्या कलाकुसरीनें धनाढ्यांचे प्रासाद फुललेले, अशा प्रकारची ही नगरी होती. खुद्द रावणाच्या राजवाड्याचा थाट तर अवर्णनीयच होता. एकहि भिंत अशी नव्हती कीं जिच्यावर नानाप्रकारचीं रत्नें बसवून, उडते पक्षी, छत्र धारण केलेले सर्प वायुगतीनें धांवणारे घोडे, बलाढ्य हत्ती, हातांत कमल घेतलेली लक्ष्मी इत्यादि शोभिवंत चित्रें काढलीं नव्हतीं. फार काय तेथील प्रत्येक खांबन् खांब सुवर्णाचा असून त्यावर नाना प्रकारचीं रत्नें मोतीं जडलेलीं असल्यानें रात्रीं देखील दिवसाप्रमाणें झळकत असे. अशा विलासांत रहाणारे वीर लंकेमध्यें किती तरी होते.

सुधारलेली युद्धसामुग्री तेथें नेहमीं जय्यत तयार असून बुरजांवर अशीं प्रचंड यंत्रें ठेविलेलीं असत कीं तीं वज्र, तीर, धोंडे, गदा वगैरे अस्त्रांचा वर्षाव करून एकदम शेंकडों जीव ठार करीत. तटाबाहेर अत्यंत खोल खंदक असून शहरांत जाण्याकरतां निरनिराळ्या ठिकाणीं चारचार कमानींचे पूल बांधले असून त्यावरहि मोठ्या तोफा तयार असत. रात्रीं तटांच्या व पुलांच्या रक्षणार्थ सशस्त्र सैनिकांचा खडा पहारा असे. रामायणाच्या आधारें केलेल्या वरील वर्णनांत कवीची अतिशयोक्ति असणें साहजिक आहे. तेव्हां सत्यासत्यतेचा निर्णय एका दृष्टीनें कठीणच आहे.

८ शस्त्रास्त्रांचीं नांवें—रामायणांमध्यें उल्लेखिलेल्या शस्त्रास्त्रांची, फेंकण्याच्या आणि हातीं धरून लढण्याच्या—दोन्ही प्रकारच्या आयुधांचीं नांवें वाचून मन खरोखर आश्चर्यानें थक्क होऊन जातें. नमुन्यादाखल कांहीं आयुधांचीं नांवें पुढें दिलीं आहेत. वज्रास्त्र, शिवशूल, ब्रह्मशिर, ब्रह्मास्त्र, शिखरी, गदा, धर्मपाश, शुष्कवज्र, आर्द्रवज्र, पिनाकास्त्र, आग्नेय, वायव, क्रौंच, गांधर्व, मोहन, प्रशमन, सौम्यवर्षण, श्लेषण, विलापन, मदन, तामस, माया, सौध इत्यादि अस्त्रें; कपाल, मुसल, तलवार, शक्ति, भाला, गदा, चक्र, शूल, फरशी, फांसा, परिघ, शतघ्नी ( तोफा Howitzers ), शिवाय नाना प्रकारचे धनुष्यबाण.

९ **श्रीरामकालीन राज्यसंस्थाः**– इक्ष्वाकु वंशात वडील मुलालाच राज्य मिळण्याचा अधिकार असे. रामचंद्राला वनवासाला धाडलें तेव्हां न्यायशील व सत्यवादी भरतानें कितीतरी वेळां ही गोष्ट सांगितली आहे कीं, श्रीराम ज्येष्ठपुत्र असल्यानें त्यालाच राज्यपद मिळालें पाहिजे. कारण वडील मुलाच्या जागीं इतर कोणी तरी बसावें ही इक्ष्वाकुवंशाची रीत नाहीं. प्रजेचेहि अधिकार पुष्कळ असून त्यानें राजाच्या सत्तेला बराच आळा बसला होता. श्रीरामाला युवराजपद देतांना महाराज दशरथानें आपल्या लोकसभेची संमति घेतली होती. आणि पुन्हां श्रीरामास बोलावून त्यासहि त्यानें पुढील संस्मरणीय उपदेश केला. 'प्रजेची संमति चंचल असते, ती केव्हां बदलेल याचा नेम नसतो. आज जी सभा तुला युवराजपद देण्यास अनुकूल आहे तिनेंच दुसऱ्या कोणाला तरी युवराज करण्याची पाळी कधीं न येवो. यास्तव यौवराज्याचा स्वीकार करण्याची शीघ्र तयारी कर.' यावरून स्पष्ट दिसतें कीं, त्या वेळीं प्रजेचे अधिकार मोठे होते.

१० **रामायणः**— कविशिरोमणि वाल्मीकिकृत रामायण महाकाव्यापासूनच श्रीरामचंद्राचा इतिहास समजतो. हे आदि--महाकवि अयोध्याप्रांतांजवळील एका वनांत रहात होते. प्रजेच्या संशयांनीं ग्रस्त होऊन रामानें पुण्यश्लोक जानकीला आपल्या राज्यांतून हद्दपार केलें असतां ती याच ऋषीच्या आश्रमांत राहूं लागली व तेथेंच तिला लवकुश हें पुत्रद्वय झालें. श्रीरामचंद्राच्या गुणपराक्रमावर लुब्ध होऊन यांनीं रामायण रचिलें व रामपुत्रांना तें पढविलें. एकदां श्रीरामानें एक महायज्ञ केला असतां त्या प्रसंगीं वाल्मीकीबरोबर लव, कुश यांनीं ती चेतोहर कथा गाऊन सर्व लोकांचीं हृदयें आकर्षून घेतलीं. त्यावेळेपासून या अनुपम काव्याची उत्तरोत्तर प्रसिद्धि व वाढ झाली. आणि अनेक कवींनीं आपआपल्या परीं त्यांत वेळोवेळीं भर घातली. यामुळें आज उपलब्ध असलेलें वाल्मीकिरामायण एकाच कालीं लिहिलेलें नाहीं, त्यांतील बराच भाग इ. स. ४०० पर्यंत रचलेला आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, रामायण हे लौकिक विषयावरील पहिलें काव्य आहे. कालदृष्ट्या त्याला मिळालेला हा मान त्यानें गुणदृष्ट्याहि मिळविलेला पाहून कोणाला सानंद कौतुक वाटणार नाहीं?

या ग्रंथाची मधुरता, गंभीरता, शब्दरचना, रस, अलंकार इत्यादि गुणांनीं जगांतील सर्व रसिकांना इतकें मोहित करून टाकिलें आहे कीं, जगांतील सर्व प्रसिद्ध भाषांत त्याचीं भाषांतरें झालीं आहेत. कांहींचें तर असेंहि मत आहे कीं, प्रसिद्ध ग्रीक कवि होमर यानें आपलें सुप्रसिद्ध काव्य इलिअड हें रामायणाच्याच आधारें लिहिलें.

अलीकडच्या काळींहि श्रीतुळसीदासानें हिंदी भाषेमध्यें रामायण लिहून अखिल भारतवर्षावर मोठा उपकार करून ठेवला आहे.

श्लेगेल ह्मणतो, 'वीररस उत्पन्न करण्याऱ्या पुस्तकांमध्यें रामायण श्रेष्ठ आहे.' प्रो. विलिअम् ह्मणतो, 'संस्कृत साहित्यांतील रामायण हा एक अद्वितीय हिरा आहे. कोणत्याही स्थलीं व कोणत्याही कालीं इतकें सुंदर काव्य कोणीहि पाहिलें नाहीं. ग्रिफिथ म्हणतो, 'प्रत्येक देशाच्या व कालाच्या साहित्याला रामायणाचें आव्हान आहे कीं, सीता रामासारख्या पूर्णत्वास पोचलेल्या विभूतींचें चित्र काढलेलें असें एकादें तरी काव्य दाखवा.' रामायणांत ४८००० ओळी असून इलिअडमध्यें फक्त १५६९३ आहेत. [रामायणाच्या आधारें होमरनें इलिअड रचलें या विषयावर Rama and Homer by Lillie हा ग्रंथ पहा.]

\+ + २ + +

११ श्रीरामापासून युधिष्ठिरापर्यंतच्या काळचा भारतवर्षाचा इतिहास गडद्याआडच आहे. पुराणांमध्येंहि या मध्यंतरीच्या कालामधील राज्यासंबंधीं विशेष माहिती मिळत नाहीं. यास्तव या हजार वर्षांवरून उडी मारून एकदम युधिष्ठिराच्या रियासतींत येणें भाग आहे.

१२ युधिष्ठिराच्या कालाचा निर्णय अजून झाला नाहीं. यासंबंधीं मुख्यतः दोन मतें प्रचलित आहेत. एक पक्ष म्हणतो, भारतीय युद्ध खि. पू. ३१ शें मध्यें झालें व दुसऱ्याच्या मतें तें खि.पू.१४शें मध्यें झालें. दोन्ही पक्षांना पुष्टिदायक अशीं कांहीं प्रमाणें असल्यानें यापैकीं अधिक सयुक्तिक अगर सत्य कोणता हें आजच सांगतां येत नाहीं.

**१३ महाभारत कथा**—कौरवपांडवांचा इतिहास महर्षि व्यासकृत महाभारत नामक काव्यावरून समजतो. हे महापराक्रमी वीरपुरुष भरत राजाचे वंशज. यांच्यामध्यें एक भयंकर यादवी झाली. हीच भारतीय अगर कुरुक्षेत्राचें युद्ध या नांवानें प्रसिद्ध आहे. यामध्यें कपटी व महत्वाकांक्षी कौरवांचा नाश होऊन सच्छील पांडवांचा जय झाला. महाभारताचें सार हेंच होय.

**१४ ग्रंथ**—दुसऱ्या प्रकरणांत दिग्दर्शन केल्याप्रमाणें महाभारत ग्रंथांत वेळोवेळीं भर पडत गेल्यानें त्याचें ऐतिहासिक महत्व कमी झालें आहे. मूळ भारतांत १६ हजार ओळी होत्या. निरनिराळ्या कथा, वर्णनें, पूजा, मतें, उपदेश, तत्त्वज्ञान, उपासना वगैरेंची ७।८शें वर्षांत तीन इसत्यांनीं भर पडून आजचें **महाभारत** ४८ हजार ओळींचें झालें आहे. भगवान् श्रीकृष्णांनीं दोहन केलेलें भारतीय तत्त्वज्ञानाचें सार म्हणून प्रसिद्ध असलेलें गीता उपनिषद् महाभारतांतील सर्वांत ओजस्वी भाग आहे.

**१५ कुरुक्षेत्राचें युद्ध**—या युद्धांत युधिष्ठिराचे बाजूस ७ अक्षौहिणी आणि दुर्योधनाचे बाजूस ११ अक्षौहिणी मिळून एकंदर ३९३६६०० इतके सैनिक होते. इतकी अफाट सेना जगाच्या प्राचीन इतिहासांत कधींच एकत्रित झाली नव्हती. ही संख्या अतिशयोक्तीची असावी असें वाटण्याचा संभव आहे; परंतु या युद्धांत भारतवर्षांतील सर्व व इतर देशांच्याहि राजांनीं भाग घेतला असल्यानें इतकी सेना जमणें अगदीं अशक्य नाहीं. जर्कसिज यानें ग्रीसवर ५३ लाख सैन्य आणि चाकर नोकर घेऊन हल्ला केला. अमेरिकन यादवीमध्यें २२ लाख सैन्य होतें. सेमिरस यानें हिंदुस्थानावर ३० लाख पायदळ, ५ लाख स्वार, १ लाख रथ आणि दोन हजार जहाजें इतक्या सैन्यानिशीं हल्ला केला.

हें घोर, सर्वनाशक महायुद्ध एकसारखें अठरा दिवस चालू होतें. दररोज बडे बडे वीर, पराक्रमी शस्त्रवेत्ते योद्धे लाखांनीं मृत्युमुखीं पडत होते. कौरवसेनापति भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, अश्वत्थामा हे युद्धकलेंत अतिकुशल असे महावीर होते. पण अर्जुन, भीम आणि श्रीकृष्ण यांच्या युक्ती-




इंद्रप्रस्था ( दिल्ली ) मधील पांडवगड

[ खि. पू. ४५० (?) ]

[ पृष्ठ २८

पुढें आणि शौर्यापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. या युद्धांत अनेक प्रकारचे व्यूह रचित असत. उदाहरणार्थ, मध्यभेदी, अन्तर्भेदी, मकरव्यूह, श्येन-व्यूह, शकटव्यूह, अर्धचन्द्र, सर्वतोभद्र, गोमूत्रिक, दंड, भोज, मंडल, असंहात, इ. धृतराष्ट्राच्या वंशांतील एकहि पुत्र या युद्धांतून वांचला नाहीं. पांडवांचेहि सर्व राजपुत्र मारले गेले. मृत सैनिकांची तर गणतीच नव्हती. लाखों स्त्रिया विधवा झाल्या. पिता-पुत्र-बंधु शोकानें जिकडे तिकडे एकच हाहा:कार उडाला; आणि कांहीं काल अखिल भारत शोकसागरांत बुडून गेला.

१६ **शस्त्रास्त्रें**-- या भारतीय युद्धांत ज्या अनेक शस्त्रास्त्रांचा व यंत्रांचा उपयोग करण्यांत आला, त्यांतील कांहीं अत्यंत अद्भुत व विचित्र होतीं. त्यावरून असें पूर्ण सिद्ध होतें कीं आर्यांनीं युद्धविद्येत चांगलेच प्राविण्य संपादन केलें असून त्यांनीं युद्धशास्त्र व युद्धक्रिया यांची चांगली परिणति केली होती. शस्त्रास्त्रें पांच प्रकारचीं होतीं:--स्वाभाविक, निर्मित हस्तमुक्त, मुक्तामुक्त व यंत्रमुक्त. या प्रकारांचीं कांहीं उदाहरणें पुढे दिलीं आहेत त्यावरून दिसून येईल कीं, प्राचीन आर्यांना किती तरी प्रकारच्या तोफांची, बंदुकांची आणि इतर उत्कृष्ट आयुधांची माहिती होती. मुख्य मुख्य आयुधांचीं नांवें प्रथम दिलीं आहेत.

ढाल, तरवार, अंकुश, गदा, मुद्गर, मुसल, अस्थिसंधि, क्षुरप्र, शक्ति, तोमर, बरची, वल्क, नाराच, परशु, पराश, पाट्टिश, परिघ, कचग्रह, चक्र, त्रिशूळ, कंपन, क्षुरास्त्र, चक्रविशिख, विद्युतास्त्र, प्रमोहन, प्रशान, अंतर्धान, वारुणेय, वायव्य, आग्नेय, पर्जन्यास्त्र इ.

पुढें कांहीं भिन्न यंत्रांचीं नांवें दिलीं आहेत:-शतघ्नी, भुशुण्डी, अग्नियंत्र, वज्र, चक्राश्म ( धोंडे फेंकण्याचें यंत्र ), अयस्कण्व ( लोखंडी गोळे उडविण्याचें यंत्र ), तुलगदा ( या तोफांना चाकें असत; त्या हवेच्या दाबानें चालत असून त्यांचा मेघाप्रमाणें गडगडाट होत असे. )

१७ **युद्धाचे परिणाम**:—(१) युधिष्ठिराला हस्तिनापुरीं राज्याभिषेक झाला. त्यानें मोठ्या धर्मानें, शांततेनें आणि न्यायानें छत्तीस वर्षें राज्य केलें. तथापि राजपुत्र, बांधव वगैरे आप्तेष्टांच्या मृत्यूमुळें त्याचें मन राज्या-

कडे लागेना. याच वेळीं त्यानें श्रीकृष्णाच्या संमतीनें अश्वमेध यज्ञ केला. पण शेवटीं यामुळेंहि मनाला शांति न मिळाल्यामुळें अर्जुनाचा नातू परीक्षित याच्या हवालीं आपलें राज्य करून युधिष्ठिरानें हिमालयाचा मार्ग पत्करला, आणि तेथेंच आपला देहत्याग करून यमलोकाप्रत जाता झाला. खरोखर एकदां दुसऱ्याचा घात केल्यावर राजपदापासूनहि निष्कंटक सुख मिळत नाहीं हेंच खरें. (२) मोठमोठ्या शहरांतील पुरुष युद्धांत कामास आल्यानें तेथील स्त्रियांची संख्या अधिक झाली यामुळें व्यभिचार आणि वाईट चालींचा फैलाव झाला. (३) या सर्वनाशक युद्धांत बहुतेक वीर, योद्धे, क्षत्रिय, विद्वान् मारले गेल्यानें येथील विद्येचा आणि शौर्याचा कांहीं काल लोप झाला, आणि भारतवर्षाला उतरती कळा लागली.

१८ **श्रीकृष्ण व भगवद्गीता**:—सर्व महाभारत ग्रंथास जर एका सुंदर सुवर्णालंकाराची उपमा दिली तर श्रीकृष्णचारित्र व त्याशीं गाढ निगडित असलेली भगवद्गीता यांना त्यांतील अत्यंत तेजस्वी हिऱ्यांचीच उपमा दिली पाहिजे. भारतकालापासून आजपर्यंत हजारों वर्षें भारतवर्षाच्या कानाकोपऱ्यांतून श्रीकृष्णाचें नांव व चरित्र भरून गेलें आहे; एवढेंच नव्हे तर त्याच्या अत्यंत मनोहर व उदात्त चरित्रानें सर्व आबालवृद्ध आर्य स्त्री-पुरुषांस वेडावून सोडलें आहे. शिवाय कृष्णचारित्रांत ऐश्वर्य, बुद्धि, पराक्रम, नीति, योग, सौजन्य, सौंदर्य, त्याग इत्यादि लोकोत्तर गुणांचा अलौकिक सहवास व उत्कर्ष असला तरी त्याचबरोबर गवळ्यांच्या मुलांत वाढलेल्या या चतुर पुरुषाचें चरित्र इतर अवतारी पुरुषांच्या चरित्रापेक्षां अधिक मानवी कक्षेंतील असल्यामुळें प्रत्येक मनुष्याला तें अधिक उपयुक्त, उपदेशपर व मोहक वाटतें. या योगीश्वर पुरुषानें पांडवांचा सत्पक्ष प्रस्थापित करण्याचें महत्कार्य केलें खरें. पण एका दृष्टीनें त्याचें यापेक्षांही महत्तर कार्य कुरुक्षेत्रावर युद्धाच्या भयंकर परिणामांच्या कल्पनेनें शोकपूर्ण व विषण्ण झालेल्या अर्जुनाच्या निमित्तानें त्यानें अखिल जगालाच सर्वोपनिषदांचें दोहन करून आत्मानात्म विवेक आणि उच्चतम धर्म व नीति यांचें उपदेशामृत पाजलें हें होय. हजारों वर्षें लाखों पंडितांनीं रसास्वाद घेऊनहि गोडी न संपलेल्या या गीताची थोरवी

काय वर्णावी ? मोठमोठ्या पंडितांना गुंगविणारे आत्मविद्येचे गूढ सिद्धांत अत्यंत स्पष्टपणें, थोडक्यांत व प्रासादिकपणें मांडणारा, भक्ति, ज्ञान, कर्म या तीनहि मार्गांचा सुंदर समन्वय घालणारा, संसारदुःखांनीं त्रस्त झालेल्या मनुष्याला चिरशांति देऊन त्यास धर्माचरणाचें निष्काम कर्मयोगरूपी रहस्य सांगणारा गीतेसारखा सुबोध व सुंदर ग्रंथ जगांतील वाङ्मयांत क्वचित्च सांपडेल. श्रीकृष्णचरित्र व श्रीमद्भगवद्गीता यांचें यथामति परिशीलन करणें हें प्रत्येक भारतीय विद्यार्थ्यांचें पवित्र कर्तव्य आहे.

**महाभारतकालानंतर ब्राह्मणादि ग्रंथाच्या रचनेचा काल.** ऐतरेय ब्राह्मणासारखे अपवाद वगळल्यास शतपथादि सर्व ब्राह्मणें महाभारतानंतर रचलीं गेलीं. ब्राह्मणग्रंथांनंतर आरण्यकें व उपनिषदें झालीं. ब्राह्मणांमध्यें कर्मकांडावर जोर दिला असून आरण्यकांनीं याविरुद्ध प्रतिकाराला सुरवात केली आहे, तर उपनिषदांनीं सर्वस्वी ज्ञानकांडाचाच पुरस्कार केला आहे.

१९ **ब्राह्मण ग्रंथः**—ऐतरेय, तैत्तिरेय, शतपथ, गोपथ, ताण्ड्य, इत्यादि ग्रंथ वैदिक वाङ्मयाचे भाग आहेत. त्यांमध्यें वेदांतील मंत्रांचा विविध यज्ञांमध्यें उपयोग करण्याचा विधि, त्यांचे स्थलकाल, त्यांचीं कारणें व तत्संबंधीं आख्यानें सांगितलीं आहेत. राजेलोक व ब्राह्मणादि वर्ण यांनीं नानाप्रकारचे यज्ञ करीत आपलें आयुष्य घालवावें म्हणजे इहलोकीं व परलोकीं सुख मिळेल अशी शिकवण त्यांत ठिकठिकाणीं दिली आहे. त्याप्रमाणें अग्निहोत्र, चातुर्मास्य, दर्शपौर्णमास, सौत्रामणी, वाजपेय, अश्वमेध, राजसूय, सर्वमेध, पुरुषमेध इत्यादि अनेक यज्ञ केले जात. त्यावेळीं गंगायमुनामधील अत्यंत सुपीक प्रांतीं आर्यांच्या सामर्थ्याचें केंद्र होतें. पंजाबमध्यें कुरु, पंचाल, वास आणि उशीनर या जातींचें राज्य होतें. पश्चिमेकडील देशांत स्वतंत्र राज्य होतें. बंगाल आणि ओरिसामध्यें आंध्र, पुंड्र, शबर, पुलिंद, मुतिबा या जाति होत्या. दक्षिणेमध्यें भोज जातीचें वास्तव्य होतें. उत्तर कुरु आणि उत्तर भद्र देशांत प्रजासत्ताक राज्य होतें. वेदांत दिसून येणाऱ्या संस्कृतीपेक्षा ब्राह्मण ग्रंथांतील सामाजिक स्थिति, आर्थिक परिस्थिति, ज्योतिषाची प्रगति, शिल्पाची उन्नति व प्रजासत्तात्मक

पद्धति अधिक उच्च प्रकारच्या दिसून येतात. स्त्रीला अर्धांगी, श्री, आणि लक्ष्मी म्हटलें आहे. घोर अपराध केला असला तरी स्त्रीचा वध निषिद्ध मानला आहे. ब्राम्हण वाङ्मयापैकीं शतपथ ब्राह्मणाचा स्वदेशीय आणि परदेशीय वाङ्मयावर बराच परिणाम झाला आहे. उदा० त्यांतील जल-प्रलयाच्या कथा मिसर खाल्डिया, ग्रीस या देशाच्या वाङ्मयानीं, बायबलानें व कुराणानेंहि उचलल्या आहे.

**१० आरण्यकें व उपनिषदें**:—यांमध्यें तत्त्वज्ञानाचा विषय आहे. प्रकृति, आत्मा व ब्रम्ह याचें स्वरूप काय? त्यांचे परस्पर संबंध कसे आहेत? जग कसें उत्पन्न झालें? मनुष्याचे कर्तव्य कोणतें? त्याला मोक्ष कसा मिळू शकेल? अशा प्रकारच्या सूक्ष्म प्रश्नांचीं उत्तरे यांत दिलीं आहेत. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता श्लेगेल म्हणतो, 'आर्यांचें तत्त्वज्ञान माध्यान्हाच्या सूर्याप्रमाणें आहे आणि त्याच्यापुढें युरोपचें तत्त्वज्ञान मिणमिणित दिव्याप्रमाणें वाटतें.' डॉ. डायसेनचेहि शब्द संस्मरणीय आहेत— 'भावी तत्त्वज्ञानाची दृष्टि भारतवर्षाकडे राहील; कारण मोक्षाच्या सिद्धाताचें शिक्षण तेथेंच मिळं शकतें.' डफ साहेबानें अशी कबुली दिली आहे कीं, 'भारतीय तत्त्वज्ञान इतके विस्तीर्ण आहे कीं, त्यांत युरोपियन तत्त्वज्ञानांचीं सर्व अंगें सांपडतात.' 'सर्व तत्त्वज्ञानांचें बीज उपनिषदांत आहे' असें गोल्डस्टकरनें म्हटलें आहे.

यज्ञकर्म सोडून देऊन योगाभ्यासाने अथवा भक्तिद्वारा परमेश्वराचें दर्शन आणि मुक्ति मिळणें शक्य आहे. यास उपाय म्हणून, अहिंसा, सत्याचरण आणि संन्यास यांचा उपदेश करून उपनिषदांनीं उन्नत शांततेचें साम्राज्य पसरविलें. पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाही ब्रह्मविद्येच्या अध्यापनाचा अधिकार होता. मैत्रेयी आणि गार्गी याचा संवाद कौतुकास्पद आहे. या गूढ ब्रम्हविद्येच्या प्राप्त्यर्थ ब्राम्हण आणि क्षत्रिय यांच्यांत स्पर्धा लागून राहिली होती. भोगांचा त्याग करून परमानंदाच्या प्राप्तीकरतां वनामध्यें संन्यस्त वृत्तीनें आयुष्य घालविणाऱ्या ऋषींच्या विचारतरंगांचा उपनिषदांत अमूल्य संग्रह आहे. हा अत्यंत प्राचीन असला तरी, ब्रह्मज्ञानाचा अजरामर उदधि असून भारतवर्षाला अखिल जगाच्या अध्यात्मिक साम्राज्याच्या सिंहासना-वर खास राज्याभिषेक करील.

२० षड्दर्शनें—वेदांना आप्त प्रमाण मानणारे असे हिंदुतत्त्वज्ञानाचे सहा मुख्य संप्रदाय आहेत. त्यांचीं ६ दर्शनशास्त्रें प्रसिद्ध आहेत. कपिलाचें सांख्य, पतंजलीचें योग, कणादाचें वैशेषिक, गौतमाचें न्याय, जैमिनीचें पूर्वमीमांसा, आणि व्यासाचें उत्तरमीमांसा अगर वेदान्त हीं तीं होत. या दर्शनांवरून आमच्या तत्कालीन उच्च संस्कृतीची साक्ष उत्कृष्टपणें पटते. स्थलाभावीं, येथें नुसतीं कांहीं पाश्चिमात्य पंडितांचीं या विषयांवरील मतें दिलीं आहेत, त्यावरून आमच्या म्हणण्याची सत्यता पटून, हिंदुतत्त्वज्ञानाच्या थोरवीची कल्पना येईल. न्यायदर्शनासंबंधीं श्लेगेलनें लिहिलें आहे कीं, 'त्यांतील बुद्धिवाद व तर्कपद्धति केवळ अनुपम असून त्या कालीं ग्रीक लोकहि इतक्या उच्चतेप्रत येऊन पोहोंचले नव्हते.' रोअर या ग्रीक पंडितानें डिमॉक्रीटस् आणि कणाद यांची तुलना करून कणादाला श्रेष्ठ ठरविलें आहे. सांख्या-संबंधीं हंटरसाहेब असें खात्रीपूर्वक म्हणतो कीं, 'उत्पत्ति, विकृति आणि उत्क्रांति यांचे सिद्धान्त सांख्यांनीं जवळजवळ पक्के प्रस्थापित केले असून आधुनिक पंडितहि हळूहळू तेंच मान्य करूं लागले आहेत.'

योगशास्त्राचे बाबतींत कोणा पंडिताच्या साक्षीचीही जरूरी नाहीं. कारण जगांत इतरत्र कोठेंहि कोणीहि या विद्येचा अनुभव घेतला नाहीं. हें शास्त्र भारतवर्षाची खास मिरास असून भविष्यत्कालीं जगामध्यें सुखाचें एक अपूर्व साधन होऊन राहील. पूर्वमीमांसेला तत्त्वज्ञान म्हणतां येत नाहीं. यांत वेदांतील व ब्राह्मणांतील कर्मकांड मोठ्या युक्तीनें सूत्रबद्ध केलें आहे. या शास्त्रांत नित्यतत्त्वांची चर्चा नाहीं. परंतु यांतील तर्कशुद्ध मांडणी, चिकित्सक पद्धति, निर्णय देण्याची रीति इतकी मार्मिक आहे कीं, त्याला तोड मिळणें कठीण आहे. वेदान्तशास्त्र सर्व उपनिषदांचें सार आहे. मॅकिन्टोश न्यायाधीशसाहेब म्हणतात कीं, 'वेदान्ताचे सिद्धान्त सूक्ष्म, गूढ, सुंदर व अपूर्व आहेत.' कूझाँचें वचनहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, 'भारतवर्षाचें तत्त्वज्ञान अखिल जगांतील विज्ञानाचें सार होय.'

परदेशी व्यापारः— खि. पू. १००० च्या सुमारास ग्रीक लोक फिनिशिअनांपासून कलाकौशल्य, लेखनपद्धति इत्यादि सुधारणेच्या गोष्टी शिकले. पण फिनिशिअनांचा भारतवर्षाशीं व्यापार असून त्यांनीं आपली

सुधारणा येथूनच उचलली होती. तेव्हां या दोन्ही देशांचें गुरुत्व भारतवर्षाकडेच येतें. या समयास बादशहा सुलेमान आणि टायर नगराचा बादशहा हिराम यांनीं भारतवर्षास जहाजें पाठवून येथून हस्तिदंत, चंदन, मोर, वानरें, मसाले, सोनें, रत्नें वगैरे जिन्नस गुजराथेंतील भीर लोकांकडून मागविले होते. यावेळीं, आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील अनेक मुख्य शहरांशीं, मिसर देशांशीं आणि अरबांशींहि आमचा व्यापार चाले. या व्यापाराकरतां भारतवासीयांनीं अनेक प्रकारचीं जहाजेंहि बांधलीं होतीं, व त्यांना ते गोड व अर्थपूर्ण नांवें देत असत.

२१ आर्थिक व औद्योगिक स्थिति—अति प्राचीन बौद्ध ग्रंथांवरून प्रो. रीस डेव्हिड्सनें खि. पू. ६०० च्या सुमाराच्या स्थितीचें वर्णन केलें आहे त्याचा सारांश असाः—शेतकरी आणि व्यापारी यांच्याशिवाय आपआपल्या धंद्यांत वाकबगार असे सोनार, कुंभार, रंगारी, हलवाई, बुरुड इत्यादि १८ धंद्याचे लोक असत. त्यांच्या श्रमसमित्या ( Guilds ) असून त्यांच्या कार्यास व नियमास राजेलोक मान्यता देत असत. जरूर प्रसंगीं त्यांच्या अध्यक्षांचा सल्ला घेतला जाई. तत्कालीन व्यापाराची स्थिति वर दिलीच आहे. त्यावेळींहि हुंड्यांची व प्रामिसरी नोटांची पद्धत होती, हें पाहून आश्चर्य वाटतें. बँका नसल्यामुळें पैसा दागिन्याच्या रूपानें किंवा जमिनींत पुरून किंवा सावकारापाशीं अगर संघापाशीं ठेव म्हणून ठेवण्याची चाल होती. त्यावेळीं दारिद्र्याचें भयानक स्वरूप दिसत नसे, मोठमोठे जमीनदार नव्हते, कष्ट करणारे शेतकरीच शेताचे मालक असत, आणि राजे लोक जबर कर घेऊन अत्याचार करीत नसत. यामुळें सर्व जनता सुखानें आणि आनंदानें रहात असे.

---




भगवान् बुद्ध, मथुरा म्युझियम्.
[ गुप्तकालची शिल्पकला ]

# प्रकरण ५ वें.

## बौद्ध काल

बौद्धकाल—आर्ष कालाचे अखेरीस भारतवर्षाच्या इतिहासांत धार्मिक जागृतीची एक प्रचंड लाट उसळली होती, व सुमारें ख्रि. पू. ५००पासून ख्रिस्तोत्तर ५०० वर्षांपर्यंतच्या अवधींत अखिल भारतवर्षाच्या राजकीय व सामाजिक जीवनावर या जागृतीचा विलक्षण परिणाम झाला. जैन व बौद्ध या दोन नवीन धर्ममतांचा उदय व प्रसार याच वेळीं झाला, व बौद्ध धर्मानें तर आपल्या अद्भुत लोकप्रियतेनें व शीघ्र प्रसारानें साऱ्या जगास हलवून सोडलें. याकरतां आर्षकालानंतरच्या कालखंडास बौद्धकाल असें यथार्थ नांव दिलें असून या विभागाच्या प्रारंभींच आर्षकालोत्तर प्रसिद्धीस आलेल्या तीन मुख्य धर्म-सांप्रदायांची माहिती व इतिहास अगोदर दिला आहे, व नंतर पुढील प्रकरणांत राजकीय इतिहास कथन केला आहे.

### नास्तिक सांप्रदाय

१ नास्तिकशिरोमणी चार्वाकः-उपनिषत्कालीं व त्यानंतरहि विलक्षण विचारस्वातंत्र्य असल्यामुळें तत्त्वज्ञांचे अनेक वैदिक-अवैदिक सांप्रदाय निघाले. पण चार्वाक-संप्रदायाइतका विलक्षण पंथ दुसरा कोणताही नाहीं. याचा आद्यप्रवर्तक बृहस्पति समजला जातो. पण संप्रदायविस्ताराचें मुख्य कार्य गुरूवरही ताण करणाऱ्या त्याच्या चार्वाक नामक शिष्यानें केलें. सर्व ज्ञान इंद्रियजन्य आहे, प्राण व मन यापलीकडील आत्मा, ईश्वर वगैरे झूट आहे, राजा हाच परमेश्वर, मोक्ष, बंधन वगैरे केवळ कल्पना आहेत, श्राद्ध, यज्ञ वगैरे विधि निरर्थक आहेत, विषयभोग हेंच जीविताचें ध्येय आहे, 'यावज्जीवं सुखं जीवेत्' कारण, 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः' असे त्या सांप्रदायाचे सिद्धांत असून 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत्' असा व्यावहारिक उपदेश आहे! नास्तिक जडवादाचें इतकें विलक्षण स्वरूप इतरत्र दुर्मिळ आहे. भारतवर्षाच्या अवनतीला [illegible]

अनिष्ट वाममार्ग कारणीभूत झाले, त्यांत चार्वाकापेक्षां घातक असा कोणताही झाला नाहीं.

## जैन धर्म.

२ वर्धमान महावीर—गौतमबुद्धाचे पूर्वी ४२ वर्षें, इक्ष्वाकु वंशांत सिद्धार्थ नांवाचा एक थोर कुलभूषण राजा होऊन गेला. त्याची राणी त्रिशला. यांचाच पुत्र वर्धमान. यानें भगवान् बुद्धाप्रमाणें एका अपूर्व धर्माचा प्रसार केला. हा धर्म आजहि हिंदुस्थानांत अस्तित्वांत आहे. वर्धमान हा देशराज होण्याऐवजीं धर्मराज झाला. तो क्षमा, दया, धर्म आणि वैराग्य यांचा जणूं काय मूर्तिमंत अवतारच होता. तिसाव्या वर्षी राजसंन्यास करून तो वनांत जाऊन राहिला. तेथें त्यानें दोन वर्षें घोर तप केलें. नंतर अखिल प्राणिमात्रावर उपकार करण्याप्रीत्यर्थ या महात्म्यानें आपल्या सर्वस्वाचा त्याग केला. माया, देह आणि मन यांना जिंकणारा वर्धमान किंवा तीर्थंकर खरोखरीच आदर्श पुरुष होय. कामक्रोधादिक सर्व विकारांना त्यानें जिंकलें असल्यानें त्याला जिन म्हणतात तें यथार्थ होय. संसारांतील दुःखें दूर करण्याचा मार्ग त्याला सांपडला तेव्हां तो राजगृह, वैशाली, कुशाली, आणि मगध या देशांत ‘ अहिंसा परमो धर्मः’ या तत्वाचा प्रसार करूं लागला. तप आणि योगसाधन यांच्या योगानें त्यानें आपलें जितेंद्रियत्व इतकें वाढविलें होतें कीं, तो नेहमीं नग्न रहात असे.

प्रचार करून कार्य झालें नाहीं तेव्हां पुन्हा वयाच्या ७२ व्या वर्षापर्यंत त्यानें एकसारखा अव्याहत १२ वर्षें प्रचार चालू ठेविला. अखेर खि. पू. ५२७ मध्यें जिन स्वर्गवासी झाला.

३ तीर्थंकरः—जैन लोक वर्धमानाला महावीर म्हणतात आणि याच नांवानें तो आज प्रसिद्ध आहे. हा जैनमताचा आद्य संस्थापक नव्हे तर एक महाश्रेष्ठ प्रचारक होता. कारण महावीराच्या पूर्वी २३ तीर्थंकर होऊन गेले असें जैनलोक मानतात. यांपैकीं विशेषतः महावीर आणि त्याच्या पूर्वीचा पार्श्वनाथ याचीच पूजा ते करतात. छोटा नागपूर येथें ४५०० फूट उंचीचा एक डोंगर आहे त्यास पार्श्वनाथाचा डोंगर म्हणतात. तेथें जैनांचीं पुष्कळ



जिन्ह भगवानाची रत्नजडीत मूर्ति

( ही आबु पर्वतावरील सुप्रसिद्ध जैन मंदिरात आहे )

( पृष्ठ ३५ )

सुंदर देवालयें आहेत. पार्श्वनाथ सुमारें खि. पू. ८०० च्या सुमारास होऊन गेला. त्याची पूजा करणाऱ्यांस श्वेतांबर जैन म्हणतात आणि निर्ग्रंथ व नग्न महावीराची पूजा करणारे दिगम्बर या नांवानें प्रसिद्ध आहेत. आपल्या गुरूप्रमाणें हल्लीचे जैनसाधूहि 'दिशोऽपि वसनम्' असेच रहातात. त्यांचें वस्त्र म्हणजे दिशाच !

४ जैनधर्माचा विस्तारः—जैनधर्माविषयीं मोठें अज्ञान आहे. कारण ( १ ) जैन आपले धर्मग्रंथ छापत नाहींत. ( २ ) या धर्माचा प्रसार भारतवर्षाच्या बाहेर परदेशांत फारसा झाला नाहीं. अर्थात् प्रथम प्रथम मिसर, ग्रीस, पश्चिम आशिया वगैरे देशांत थोडा प्रचार झाला, पण तो किरकोळ. ( ३ ) ब्राह्मणांनीं जैनांना नास्तिक मानून त्यांच्या देवालयांत जाण्याची हिंदूंना बंदी केली होती. परंतु जेव्हां स्त्रीजात दुःस्थितीच्या खोल गर्तेत लोटली गेली होती, प्रत्यहीं हजारों प्राण्यांचा जीव घेतला जात होता, बदचालीची लाट देशभर उसळली होती आणि भारतवर्ष आचार-हीन, दयाहीन, धर्महीन आणि लज्जाहीन बनला होता, तेव्हां वाममार्गाचा नाश करून त्याला जागृत करण्याचे भगीरथ प्रयत्न महावीर आणि त्याच्या मागून बुद्ध यांनीं केले आणि ते सफल झाले. पुरातन आर्यधर्माचा पुनरुद्धार झाला आणि आजतागायत जैनामध्यें दयाधर्माचा बहुत विस्तार झाला असून, 'दया धरमका मूल है' हें तत्त्व कायमचें प्रस्थापित झालें आहे. जैनमत सध्यां दाक्षिणेंत आणि गुजराथेंत प्रचलित असून जैनांची संख्या १५ लाख आहे.

## बौद्ध धर्म

५ गौतमबुद्धाचा जन्म–खि. पू. ६७ सालीं, रोहिणीनदीच्या तटाकीं असलेल्या कपिलवस्तूंत ( आजचें नांव कलबस्ती ) झाला. तेथें शाकीय लोकांचें स्वतंत्र प्रजासत्ताक राज्य होतें. तेथील महाराज शुद्धोदन आणि त्यांची धर्मपत्नी महाराणी मायादेवी यांच्या पोटीं लुंबनी नामक वनामध्यें गौतमाचा जन्म झाला. राजकुमाराचें नांव सिद्धार्थ असें ठेवण्यांत आलें. बालपणापासूनच खेळ वगैरेपेक्षां एकांतवासाची आवड

त्यांस अधिक होती. मधुर भाषण, दयाळु स्वभाव, स्नेहबुद्धि इत्यादि गुणांनीं गौतमाची प्रत्यहीं अधिकाधिक प्रसिद्धि होऊं लागली.

६ **वैराग्य**—आपल्या वैराग्याची जाणीव सिद्धार्थानें आपल्या मातापितरांस अनेकदां दिली असल्यानें ते विशेष चिन्तातुर झाले. युवराज विरक्त होऊं नये यास्तव हजारों भोगविलासांत त्याला ते रंगवून ठेवीत. शिवाय बालपणीं यशोधरा नामक सुंदर कुमारीशीं त्याचा त्यांनीं विवाहहि करून टाकला. २८व्या वर्षापर्यंत नानाविध विषयसुखामध्यें बुद्धदेव रंगून गेला होता. नंतर त्याला लवकरच राज्यपद मिळणार असल्यानें एकदां त्याला आपली राजधानी पाहण्यास पाठविण्यांत आलें. राज्यारोहणानिमित्त सारें नगर सुंदर सजविलें असून, त्या आनंदप्रसंगीं सर्व अप्रिय दृश्यें पडद्याआड करण्याची काळजी घेण्यांत आली होती. तरी अखेर एक वृद्ध, एक रोगी आणि एक मृत असे तीन भिन्न अवस्थेंतील तीन पुरुष राजपुत्राच्या दृष्टिपथांत आलेच. त्यांची दारुण अवस्था पाहून बुद्धदेवाला फार दुःख झालें. कारण त्या दृश्यांवरून त्याला कळून चुकलें कीं, आपणांसहि एक दिवस असेंच आजारी पडून मरून जावयाचें आहे! कांहीं वेळानें त्यानें आणखी एक दृश्य पाहिलें. तें एका साधूचें होतें. अंगांत फाटके कपडे, हातीं दण्डकमंडलू, राजांना शोभेल अशी रुबाबदार चाल, तपःप्रभावानें व आनंदानें विलसणारें मुख आणि प्रेमळ हृदय, असें तें दृश्य पाहून आपण साधू होण्याचा बुद्धदेवानें निश्चय केला.

७ **राजत्याग**—प्रिय पत्नी यशोधरा, पूज्य मातापितरें आणि राज्यपद यांच्या मोहमायेनें आपण जखडलों आहोंत हें जाणून एके रात्रीं बुद्धानें आपला राजवाडा एकदम सोडला आणि वनांत जाऊन तरवारीनें केस काढून, साधूचा वेष धारण करून तो दोन पंडितांचा शिष्य झाला. पण यानें आपला उद्देश सिद्धीस जात नाहीं हें पाहून गयेजवळ उरुवेला नांवाचें एक निबिड अरण्य आहे, तेथें तप करण्याकरितां तो गेला. पांच वर्षांच्या घोर तपानें मायामोहाची बेडी तोडून त्यानें ज्ञान प्राप्त करून घेतलें. नंतर बोधी वृक्षाखालीं ४९ दिवस समाधि लावल्यावर त्याला आत्मविश्वास झाला कीं, आपणास धर्माचा राजमार्ग सांपडला.

८ **बौद्धधर्माचा प्रचार**—अरण्यवास सोडून दुःखी, कष्टी जगाला धर्माचा सन्मार्ग दाखविण्याकरितां बुद्ध इतस्ततः संचार करूं लागला. काशीमध्यें तर सर्व स्त्री–पुरुष त्याच्या सदुपदेशानें मोहित होऊन गेले. आणि तेथील श्रोते त्याच्या अपार ज्ञानास अनुलक्षून इतःपर त्यास बुद्ध-देव असें म्हणूं लागले. बुद्धाचें पहिले प्रवचन काशीजवळील सारनाथ या ठिकाणीं झालें. ( येथे बुद्धाची सुंदर मूर्ति व देवालय असून बौद्ध धर्मचक्रहि आहे. ) काशीहून बुद्ध राजगृहास आला. तेथील राजा बिंब-सार हा आपल्या प्रजेच्या समवेत एक महायज्ञ करण्याच्या तयारींत होता. शेंकडों बकरे व मेंढे बळी द्यावयाचे होते. हें पाहून धर्ममूर्ति दयासागर बुद्धानें सर्वांना एकत्र बोलावून ' अहिंसा परमो धर्मः ' यावर सुंदर, प्रभा-वशाली प्रवचन केलें. त्या घोर यज्ञाचा बेत तत्काळ रहित करण्यात आला, आणि सर्वांनीं बुद्धाच्या नव्या धर्माचा स्वीकार केला. राजगृहा-हून बुद्ध आपल्या जन्मभूमीस ( कपिलवस्तु ) आला. तेथें त्याच्या वृद्ध मातापित्यांनीं आपल्या प्रजेसहित परिव्राजक बुद्धाच्या नवीन धर्माची दीक्षा घेतली. याप्रमाणेच बिहार आणि संयुक्त प्रांतामध्यें फिरून सदा-चार, दया, दान आणि अहिंसा इत्यादि तत्त्वांच्या अपूर्व उपदेशाने त्याने लाखों स्त्रीपुरुष शिष्य केले. अशाच रीतीनें तो आमरणान्त उपदेशकार्य करीत राहिला, व ख्रि. पू. ४८३ सालीं ( डॉ. फ्लीटच्या मतें ) देहत्याग करून निर्वाणपदास गेला.

९ **बुद्धाची शिकवण**—हिचा थोरपणा तिच्या आश्चर्यकारक प्रचारा-वरून कळून येतो. ( १ ) बौद्धांनीं आणि हिंदूंनीं बुद्धाला प्रत्यक्ष अव-तार मानले असले, तरी त्या महात्म्यानें स्वतःस कधींहि अवतार अगर ईशप्रेषित अगर धर्मसंस्थापक म्हटलें नाहीं. ( २ ) तत्कालीन भारतसमाज अत्याचारी व अनाचारी लोकांच्या दुष्कर्मांनीं गांजून गेला होता. तसेंच जातपातींच्या बंधनांनीं स्त्रियांची आणि शूद्रांची मोठी काठिण अवस्था झाली होती. अशा वेळीं बुद्धानें समतेचा आणि अहिंसेचा प्रचंड व तेजस्वी प्रचार केला, पापभीरु व पवित्र आचरणाच्या शूद्रांनाहि आपल्या मठांत समतेनें वागविलें, आणि त्यांना शिक्षण

दिलें. यामुळें या लोकांचे थवेच्या थवे बौद्ध झाले. ( ३ ) बुद्धानें खरें तेंच सांगितलें कीं, जन्मतःच कोणी ब्राह्मण होत नाहीं, तर ज्ञानी, आशातीत, अहिंसक, सत्यप्रिय, धार्मिक, जितेंद्रिय, क्षमाशील, विरक्त, संतोषी, निर्व्यसनी, अशा महानुभावास ब्राह्मण म्हणतात. 'ज्याप्रमाणें गंगा, यमुना, सिन्धु इत्यादि नद्या महासागरांत विलीन होऊन आपलें व्यक्तित्व सोडतात त्याचप्रमाणें माझ्या मठांत एकदां प्रवेश झाला कीं, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे समान बनतात. एवढेंच नव्हे, तर चाण्डालहि आपल्या पवित्र चारित्र्यानें बुद्ध होऊं शकतो.' उपालीसारखे न्हावी, व सनितासारखे भंगीहि प्रसिद्ध भिक्षु होऊन गेले. ( ४ ) बुद्धाच्या मतें विषयांच्या अतिसेवनानें संसार दुःखी होतो. ( ५ ) या दुःखाची निवृत्ति करण्याचा खरा मार्ग म्हणजे आशा आणि आसक्ति सोडणें हा होय.

खालील नियमांप्रमाणें सर्वांनीं वागावें अशी बुद्धाची इच्छा होती.

हिंसा करूं नये. असत्य बोलूं नये. चोरी, मद्यपान, व्यभिचार, करूं नये. दान करावें. धैर्य धरावें. सत्याचार राखावा. ज्ञानसंग्रह करावा. चित्त एकाग्र करावें.

भिक्षूकरितां पुढील पांच नियम होते:—अवेळीं भोजन करूं नको, नाचरंगास जाऊं नको, सुगंध, भूषणें वापरूं नको, विलासी वस्त्र वापरूं नको, सोन्याचांदीच्या दानाचें ग्रहण करूं नको.

१० कर्म आणि निर्वाण—बुद्धाचा कर्मविपाक आणि पुनर्जन्म यांवर विश्वास होता. 'करावें तसें भरावें' या सिद्धांतावर त्यानें भर देऊन सत्यकामना, सत्यवाणी आणि सत्यकर्म या साधनांनीं सुखदुःखापासून विरक्त होऊन निर्वाण मिळवावें असा उपदेश केला. सदाचरणाच्या अभ्यासानें उत्तरोत्तर अधिकाधिक शुद्ध झाल्यानें शेवटीं प्राप्त होणारी निष्पाप स्थिति म्हणजेच निर्वाण ! ही कल्पना हिंदुधर्मांतील मोक्षपदाच्या कल्पनेचेंच एक रूपांतर आहे. बुद्ध पुनर्जन्म मानीत असून वैदिक देवतांविरुद्ध अगर ईश्वरवादाविरुद्ध त्यानें अवाक्षरही काढलें नाहीं. त्याचे अनुयायी मात्र वैदिकधर्मापासून अधिकाधिक दुरावत गेले. वास्तविक पाहिलें तर बुद्धानें ईश्वर, आत्मस्वरूप वगैरे तत्वज्ञानाच्या गहन प्रश्नांकडे

फारसें लक्ष दिलें नाहीं. मनुष्यानें सदाचरणानें आत्मोन्नति करून पापापासून व दुःखापासून शीघ्र मुक्त व्हावें, या व्यावहारिक तत्त्वज्ञानाचा व यास उपाय म्हणून विश्वबंधुत्व, अहिंसा, सत्क्रिया, सत्य, संन्यास व अनासक्ति यांचा उपदेश, हेंच त्याचें ध्येय होतें व त्यानें ते आश्चर्यकारक सुलभतेनें, शीघ्रतेनें व परिणामकारक रीतीनें साध्य केलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

११ बौद्धधर्माच्या प्रसाराचें कारण कांहीं नवीन नाहीं. सर्व धर्म प्रायः ज्या कारणामुळें प्रसिद्धीस येऊन प्रचलित होतात त्याच कारणांनीं बौद्धधर्महि वाढला. १ भगवान् बुद्धाची मोहक मूर्ति, तप, राजत्याग, मधुर भाषण यांनीं हजारों लोकांना मोहित केलें. २ बौद्धधर्मानें आपल्या पवित्र संदेशाचा उपदेश संस्कृतांत न करतां लोकभाषेंत केला. ३ याज्ञिकांच्या व ब्राह्मणांच्या अत्याचारांनीं त्रासलेल्या जनतेनें या सरळ आणि उच्च धर्माचा चटकन् स्वीकार केला. ४ उच्च सामाजिक स्थिति, समता, बंधुभाव व विचारस्वातंत्र्य बौद्धधर्मांत प्राप्त होत असल्यानें हजारों पतित अगर अस्पृष्ट लोकांनीं या धर्माची दीक्षा घेतली. ५ अनेक शक्तिमान् राजांनीं तनमनधनें करून या धर्माचा प्रचार केला. धर्मसेवेसाठीं राजपुत्रहि भिक्षु बनले. ६ बौद्धधर्म स्त्रियांना विषमतेनें वागवीत नसल्यानें अस्पृष्ट लोकांप्रमाणेंच आपल्या जीवितास कंटाळलेल्या लाखों स्त्रियांनीं बुद्धधर्माची दीक्षा घेऊन व भिक्षुणी होऊन प्रचाराचें कार्य जोरानें केलें. अनेक राजकन्यांनींहि यांत भाग घेतला. पतित स्त्रियांचा उद्धार झाला, अखिल स्त्रियांचें दास्यविमोचन झालें, व भिक्षुणींचें प्रचारकार्यहि अधिक परिणामकारक झालें. ७ बौद्ध लोकांनीं धर्मप्रसारार्थ कोट्यवधि रुपये दान दिले. यामुळें असंख्य मठ, स्तूप, स्तंभ, मंदिरें, चैत्य, विश्वविद्यालयें, पुस्तकालयें देशदेशांतरीं स्थापन झालीं, आणि बौद्धधर्म लोकप्रिय व अमर बनला.

तीनशें वर्षांनंतर उत्पन्न झालेल्या खिस्ती धर्माच्या मिशनरी संस्था, मोनॅस्टरीज् वगैरे सर्व अशोकाच्या कार्याची नकलच आहे. यावरून बौद्धधर्माच्या प्रचंड प्रसाराची व प्रभावाची कल्पना येईल.

## १२ बौद्धधर्माच्या विस्तारार्थ झालेल्या सभा.

१ ख्रि. पू. ४८३ साली, बुद्धाचें निर्वाण झाल्यावर दोन महिन्यांनीं सुभद्रासारख्या विरोधी भिक्षूंच्या खंडणार्थ व बुद्धाच्या वचनांचा संग्रह करण्याच्या उद्देशानें कश्यप, आनन्द आणि उपालीप्रभृति पांचशें भिक्षूंनीं राजगृहामध्यें पहिली सभा भरविली. मगधाधिपति अजातशत्रु याच्या सहाय्यानें त्रिपिटक बनविलें. याचे सूत्र, विनय आणि अभिधर्म असे तीन भाग आहेत.

२ री सभा ख्रि. पू. ३८३ मध्यें वैशाली ( छपरा तालुक्यांत असावी.) या ठिकाणाजवळ वेलुकामठामध्यें महायश आदि ७० भिक्षूनीं बौद्धमताविरुद्ध उपदेश करणाऱ्या तीस हजार भिक्षूंच्या मताच्या खंडनार्थ भरविली. तेथें कालाशोक महाराजांच्या सहाय्यानें आठ महिन्यांनंतर पुन्हा त्रिपिटकाची आवृत्ति काढण्यांत आली.

३ री सभा ख्रि. पू. २४० मध्यें मौदगली प्रभृति एक हजार भिक्षूंनीं पाटणाजवळ अशोकाराम मठात भरविली सम्राट् अशोकाच्या सहाय्यानें नऊ महिन्यांनीं त्रिपिटकाची तिसरी आवृत्ति काढण्यांत आली. धर्मच्युत भिक्षूंना हांकलून देण्यांत आले, आणि निवडक भिक्षूंना भारतवर्षांत व जावा, नेपाळ, काबूल, सयाम, लंका वगैरे परदेशांत प्रचारार्थ पाठविण्यांत आलें व त्यांनीं लाखों लोकांना आपल्या धर्माची दीक्षा दिली.

ख्रि. पू. २१३ सालीं अशोकाचा पुत्र महामहेंद्र याच्या नेतृत्वाखालीं दोन लक्ष भिक्षूनीं लंकेचे महाराजाधिराज दुष्टग्रामणी यांच्या सहाय्यानें ताडपत्रावर त्रिपिटक लिहून काढला.

४ थी सभा महाराज कनिष्काच्या वेळीं अश्वघोषाच्या अध्यक्षतेखालीं झाली. त्रिपिटकाची नवी आवृत्ति निघाली. वास्तविक बौद्ध धर्मापेक्षां कांहींसा निराळाच असा धर्म या सभेनें प्रस्थापला. याला महायान किंवा उत्तर बौद्धधर्म म्हणतात. बुद्धाचा मूळ धर्म हीनयान किंवा दक्षिणबौद्ध या नांवानें प्रसिद्ध आहे.

**१३ बौद्धधर्माचा ऱ्हास होण्याचीं कारणें**—१ बौद्धधर्म केवळ संन्यासी, मुनी वगैरेसारख्या विरक्तांनाच रुचण्यासारखा असून सर्वसाधारण जनतेला

त्याच्यापासून फारसा फायदा होऊं शकत नाहीं. २ बौद्धधर्म वैराग्याचा प्रसार करीत असल्यानें सांसारिक उन्नतीच्या व समृद्धतेच्या आड येतो. या धर्माच्या अनुयायांनीं जर याचीं अस्सल तत्वें आचरणांत आणिलीं असतीं तर ब्रह्मदेश, चीन, जपान इत्यादि देश आज निराळ्याच स्थितींत दिसले असते. आजच्याप्रमाणें तेथें अहिंसेची हिंसा झाली नसती, आणि कुत्रीं मांजरें, शेळया, मेंढ्या कधींहि खाल्ल्या गेल्या नसत्या. ३ जगांत साधारणपणें कोणताही नास्तिकधर्म लोकांच्या पसंतीस उतरत नाहीं. यामुळें हळू हळू ते बौद्धधर्माकडे वक्र दृष्टीनें पाहूं लागले. ४ हिंदुधर्मानें बौद्धधर्माचे कांहीं सिद्धांत आपल्यांत सामील करून घेऊन ते पचनीं पाडिले. यामुळें इतःपर बौद्ध धर्मांत विशेष असें कांहीं राहिलें नाहीं. ५ बौद्ध भिक्षुभिक्षुणींचें आचरण बिघडलें. ते व्यभिचारी, सुखलोलुप व धनलपट बनले. ६ आणि साहजिकच जनतेमध्यें त्यांच्याविषयीं वाईट मत झालें. ७ मौर्य राजवटीनंतरच्या हिंदु राजांनीं हिंदुधर्माचा उद्धार केला, व बौद्धधर्मास उतरती कळा लागली. शक, पार्थिव, युनानी वगैरे जेते लोक कधीं बौद्ध धर्माचा तर कधीं हिंदु धर्माचा स्वकिार करीत. शिवाय गुप्त राजांनीं तर हिंदु धर्माच्या अभिवृद्धीस विशेष सहाय्य केलें. ८ कुमारिल भट्ट आणि शंकराचार्य यांच्या अपूर्व कामगिरीमुळें तर बौद्धधर्माचा जवळ जवळ लोपच झाला. ९ मुसलमान जेत्यांनीं बौद्ध भिक्षूंवर जुलूम करण्याचें आरंभल्यामुळें ते स्वदेश सोडून चीनसारख्या परदेशीं जाऊन राहूं लागले. मुसलमानी चांद जसजसा वरवर येऊं लागला तसतसा बौद्धधर्मसूर्य येथें अस्तास जाऊं लागला. १० नवीन रजपुतांचें राजमंडल हिंदुधर्माचेंच अनुयायी बनल्यामुळें बौद्धधर्म मृतप्राय झाला. उत्तर हिंदुस्थानांत बाराव्या शतकामध्यें एका बिहार प्रांताशिवाय इतरत्र कोठेंहि बौद्धधर्म प्रचलित नव्हता, व होता तोहि मुसलमानांनीं नाहींसा केला. ११ बौद्धधर्माचे यमनियम व शिस्त फार कडक असल्यानें सर्वसाधारण मनुष्यांस झेंपेनाशी झाली. शिवाय भिक्षु झाल्याविना निर्वाणप्राप्ति नाहीं या सिद्धांतामुळें तर संसारी लोकांचा निर्वाणप्राप्तीचा मार्गच खुंटला. १२ बौद्धमठांत कोणास घ्यावें याचा विधिनिषेधच राहिला नाहीं. चोर, भिकारी,

अपराधी, दुराचारी लोक अखेरचें एक निर्वाहाचें व चैनीचें साधन म्हणून भिक्षु होऊन मठांत प्रवेश करीत. यामुळें आजकालच्या अनेक ख्रिस्ती अगर हिंदू मठांप्रमाणें, बौद्धमठ अनाचारगृहें अगर दुराचारी खुशालचेंडूंचे अड्डे बनले.

(१३) देशांतील सुमारें ½ जमीन बौद्धदेवस्थानांकडे होती. त्यांची जिंदगीहि अशीच वाढली होती. तेथील दुराचरणानें जनतेची सहानुभूति त्यांनीं गमाविली होती. यामुळें पैशाची जरूर पडली कीं, राजेलोकांना त्यांचीं उत्पन्नें हवीं तेव्हां काढून घेतां आलीं, व या जमिनी गेल्यामुळें बौद्धधर्माचा पायाच आरल्यासारखा झाला.

थोडक्यांत अंतस्थ अधःपात, आश्रयाचा अभाव व इतर दोन धर्मांची वाढ यामुळें हिंदुस्थानांत एका उदात्त धर्माचा शेवट झाला.

**१४ जैन आणि बौद्ध धर्मांतील साम्य**—हे दोन्ही धर्म (१) वेदांना आणि वैदिक वाङ्मयाला प्रमाण मानीत नाहींत. तसेंच ते यज्ञाच्या विरुद्ध आहेत. (२) निर्वाणाचा सिद्धान्त मानतात. (३) ईश्वराच्या सत्तेचा इनकार करतात. प्रकृतीचें अनादित्व मानतात. सिद्ध पुरुषांची पूजा करतात. (४) जन्मसिद्ध ब्राह्मण्य मानीत नाहींत. (५) ‘ अहिंसा परमो धर्मः ’ हा सिद्धांत मुख्य समजतात. (६) दोनी धर्म राजपुत्रांनीं स्थापन केले आहेत. महावीराच्या व बुद्धाच्या पूर्वींहि कांहीं महात्म्यांनीं या धर्मतत्त्वांचा प्रचार केला अशी समजूत आहे; आणि दोघांचेंही राजांच्या सहाय्यानें ऐश्वर्य व बळ वाढून त्यांना अपूर्व स्थैर्य आलें.

**१५ त्यांतील भेद**—(१) जैन २४ तीर्थंकरांची पूजा करतात. बौद्ध २४ बुद्धांची करतात. (२) बौद्धांची त्रिरत्नें, बुद्ध, धर्म, आणि संघ असून जैनांची सत्यविश्वास, सत्यज्ञान आणि सत्यकर्म हीं आहेत. जैनांचीं निर्वाण-प्राप्तीचीं साधनें आत्मपीडा, नम्रता आणि उपवास हीं आहेत. बौद्ध यांचा निषेध करतात. (५) बुद्धाच्या अवशेषावर चैत्य वगैरे बांधून बौद्ध त्याची पूजा करतात. जैनांत असली चाल नाहीं. (६) जैनांनीं चराचर जगत् चेतन मानलें आहे, यामुळें अहिंसातत्त्वाचें महत्त्व त्यांच्यामध्यें इतकें वाढलें कीं, ते मनुष्यांपेक्षां इतर प्राण्यांची काळजी अधिक करूं लागले, व

यामुळेंच तोंड बांधणें, वाट साफ करण्याकरितां कुंचला बरोबर घेऊन जाणें, रात्रीं भोजन न करणें, उवा, ढेंकूण, वगैरे न मारणें इत्यादि चाली त्यांच्या-मध्यें पडल्या. बौद्धामध्यें या सिद्धांताला इतकें महत्व नाहीं, व व्यवहारांत तर अहिंसाधर्माचा त्यांना सर्वस्वी विसर पडलेला दिसतो.

१६ बौद्धधर्म व हिंदुधर्म—खि. पू. ५ व्या शतकांत, ब्राह्मण धर्माविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून अगर त्यांत सुधारणा करण्याच्या उद्देशानें बौद्धधर्माचा उदय झाला. यामुळें त्याचा इतिहास हिंदुधर्माच्या इतिहासाशीं गाढ निगडित झाला आहे. तेव्हां यांतलि साम्य व भेद लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. बुद्धाच्या शिकवणुकीचें विवेचन करतांना हा विषय येऊन गेलाच आहे, त्याचेंच येथें वर्गीकरण केलें आहे.

भेद—१ नाशवंत सृष्टीच्या बुडाशीं नामरूपाव्यतिरिक्त आत्मस्वरूप परब्रह्मासारखी एक नित्य व सर्वव्यापक वस्तु आहे, हा वैदिकधर्माचा सिद्धांत बुद्धास मान्य नव्हता, त्याच्या मतें आत्मा, ब्रह्म, भ्रम होत. २ आत्मज्ञानाऐवजीं दुःख, कारण, विरोध व मार्ग या चार दृश्य गोष्टींवर बौद्धधर्म उभारला आहे. ३ यज्ञयागादि कर्में हिंसात्मक असल्यानें बौद्ध तीं त्याज्य समजतात. ४ चातुर्वर्ण्य त्यांना मान्य नाहीं.

साम्य—उलटपक्षीं, १ उपनिषदांतील कर्मविपाकाची व पुनर्जन्माची कल्पना बौद्धधर्मांत प्रामुख्यानें येते. २ तसेच त्यांचे पंचमहायज्ञ, नीतिधर्म वगैरेहि वैदिक ग्रथांतून घेतले आहेत. ३ वैदिक देवता, स्वर्गादि लोकांचें अस्तित्व त्याला मान्य असून त्यांत सांख्य पारिभाषिक शब्द व वैदिक कथा येतात. ४ वैदिक संन्यासधर्माप्रमाणें मूळ ( हीनयान ) बौद्धधर्महि संन्यासपरच आहे. ५ दोन्ही धर्मांत मनाची निर्विषय स्थिति हेंच अखेरचें दृश्य साध्य आहे, व ६ वैराग्ययुक्त संन्यासानें अंतिमसुख मिळतें हाच मार्ग सांगितला आहे. ७ बौद्धधर्माचा महायान नामक भक्तियुक्त व प्रवृत्तिपर पंथ भगवद्गीतेच्या आधारें निघाला असावा असें विद्वानांचें मत आहे. ( टिळककृत गीतारहस्य. )

यावरून असें दिसून येईल कीं, बौद्धधर्म म्हणजे वस्तुतः हिंदुधर्मापासून फुटलेली एक शाखा आहे.

# प्रकरण ६ वें.

## मगधाचा इतिहास

१ प्राचीन इतिहास—मगध देश फार प्राचीन कालापासून इतिहासांत प्रसिद्ध आहे. कौरवपांडवांचे वेळीं, तेथें जरासंध नामक महापराक्रमी राजा असून त्यानें शेंकडों राजे जिंकून बंदिवासांत टाकले. नंतर श्रीकृष्णानें पांडवांना बरोबर घेऊन ब्राह्मणवेषानें त्याच्या यज्ञशाळेंत प्रवेश केला व भीमसेनाकडून त्याला कुस्तींत मारविलें. जरासंधाचा मुलगा सहदेव कुरुक्षेत्राच्या युद्धांत कौरवाच्या बाजूनें लढला. सहदेवाच्या पश्चात् २१ पिढ्या याच वंशानें मगध देशांत राज्य केलें. व नंतर तें उद्योत वंशाकडे गेलें. त्याचे पांच राजे झाल्यावर तें शिशुनाग वंशाकडे गेलें. याप्रमाणें युधिष्ठिरापासून शिशुनागवंशापर्यंत २६ राजांनीं राज्य केलें, पण त्यांचा साग्र वृत्तांत आज उपलब्ध नाहीं. यापुढील एक हजार वर्षांचा मगधाचा इतिहास म्हणजे उत्तर भारताचाच इतिहास होय. कारण येथील राजे भारतसम्राट् होते. एवढ्या कालांत येथें ६ वंश नांदले, राजगृह आणि पाटलिपुत्र ( पाटणा ) या राजधान्या झाल्या, जैन व बौद्ध धर्मांचा उदय झाला. आणि कित्येक जगप्रसिध्द सम्राट् होऊन गेले. भारतीय युद्धानंतरचे मगधाचे ८ वंश व त्यांचे काल पुढें दिले आहेत.

| | |
|---|---|
| १ जरासंध | भारतीय युद्धापासून सुमारें ५५० वर्षे. |
| २ उद्योत ... ... ... ... | सुमारें १२५ वर्षे. |
| ३ शिशुनाग ... ... ... ... | ६९०-४१३ खि. पू. |
| ४ नन्द ... ... ... ... | ४१३-३२१ ,, |
| ५ मौर्य ... ... ... ... | ३२१-१७४ ,, |
| ६ शुंग ... ... ... ... | १७४-७२ ,, |
| ७ कण्व ... ... ... ... | ७२-२७ ,, |
| ८ गुप्त ... ... ... ... | इ. स. ३२०-४८० |




यक्षाची मूर्ति, मथुरा म्युझियम.

[ मौर्यकालची शिल्पकला ]

## शिशुनाग वंश ६९०-४१३ ख्रि. पू.

२ वंशसंस्थापक—बनारसचा क्षत्रिय राजा शिशुनाग आपल्या बाहुबलानें मगध देशाचा राजा बनला. सहाच जिल्हे असल्यानें त्याचें राज्य अगदीं छोटेखानी होतें. बिहारच्या पूर्वेकडील डोंगरांतील राजगृह नामक सुरक्षित व सुमनोहर शहर त्याची राजधानी होती. हा मूळ पुरुष व त्याच्या नंतरचे तीन राजे यांचेविषयीं फारशी माहिती मिळत नाहीं.

३ विजयशाली बौद्ध बिंबिसार—या वंशांतील ५वा राजा.(१) पंधरा वर्षांचाच असतांना हा गादीवर आला व पुढें ५२ वर्षे राज्य करीत होता. यानें अंगदेश (भागलपूर, मोंगीर इत्यादि) जिंकून आपलें राज्य वाढविलें. (२) आपली जुनी राजधानी आपल्या वाढत्या राज्यविस्तारास योग्य नाहीं हें पाहून त्यानें नवीन 'राजगृह' बांधण्यास सुरवात केली. (३) भगवान् बुद्ध व महावीर यांनीं यावेळीं आपआपल्या धर्माचा प्रसार जोरानें केला. पंधरा वर्षें राज्य केल्यावर ह्या राजानें आपल्या प्रजेसह बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. (४) आपल्या राज्याचा दर्जा वाढण्याकरितां यानें कोसलची एक व वैशालीची एक अशा दोन राजपुत्रींशीं विवाह केला. (५) ५२ वर्षें राज्य करून बिंबिसारनें मगधाचें सामर्थ्य चांगलेंच वाढविलें होतें. परंतु वैशालीच्या राजकुमारीपासून झालेला मुलगा अजातशत्रु यानें आपल्या वृद्ध पित्याचा खून करून स्वतःच राज्य करण्यास आरंभ केला.

४ अजातशत्रु—(ख्रिं. पू.४९१-४५९) (१) आपल्या बापाला मारून जो गादीवर बसला तो आपल्या आजाचें राज्य बळकावण्याला काय कमी करणार ? कोशल आणि वैशाली हीं दोन्हीं राज्यें निरनिराळ्या प्रसंगीं जिंकून यानें आपलें राज्य खूप वाढविलें आणि त्याला स्थैर्यही आणिलें. कोसलचें राज्य एव्हांपासून नष्ट झालें. (२) यानें पाटलिपुत्र शहर वसविलें. या शहरास कुसुमपूर अगर पुष्पपूरही म्हणत. हेंच वाढतां वाढतां अखेर मौर्य राजांची राजधानी झालें. (३) भगवान् बुद्धाचें निर्वाण याच राजाच्या अमदानींत झालें. निर्वाणाच्या अगोदरच कांहीं वर्षें त्याची शाक्य जाति नष्ट झाली होती. कारण कोसलाधिप विरुधक यानें शाक्यांवर स्वारी करून यांचा पूर्ण नाश केला.

५ दाराची स्वारी–बिंबिसाराच्या वेळीं इराणचा बादशाह दारा यानें ख्रि. पू. ५१६ चे सुमारास भारतवर्षावर हल्ला केला आणि सिंधुपर्यंतचा सर्व मुलुख पादाक्रांत केला. इराणाच्या वीसही प्रांतांत हा प्रांत (सॅट्रपी) सर्वांत धनाढ्य समजला जात असून याच प्रांताचा वसूल सर्वांत अधिक होता. आजच्या नाण्यांप्रमाणें तो १॥ ते २ कोटी रुपये होईल. हा प्रान्त इराणच्य अंमलाखालीं किती वर्षे राहिला हे समजण्यास आज साधन नाहीं. परंतु एवढें निश्चित आहे कीं, दोनशें वर्षांनंतर ग्रीक लोकांची भारतावर स्वारी झाली तेव्हां हा प्रांत भारतीय साम्राज्याखालींच होता. दाराचा एक सेनापति स्काईलॅक्स हा नौका-सेतु तयार करून सिंधुपार झाला आणि अरबी समुद्रांतून इराणला परतला. अरबी समुद्रांतील हें पहिलेंच ऐतिहासिक जलपर्यटण होय असें मानलें जातें. अजातशत्रूनंतर ४ राजे झाले. त्यांनीं ख्रि. पू. ३७० पर्यंत राज्य केलें. यांजविषयीं विशेष माहिती मिळत नाहीं, तरी यांनीं मगध राज्याचा विस्तार वाढविला हें निश्चित आहे.

## नंदवंश (४१३–३२१ ख्रि. पू.)

६ वायुपुराणाप्रमाणें, हा वंश शूद्रराजांचा होता. यांतच 'नवनंद' होऊन गेले. हा वंश एकंदरीत अतिलोभी व प्रजेला पीडा करणारा असा होता. याचा राज्यकाल फक्त ९२ वर्षांचाच. राज्यामध्ये एकसारखी खळबळ आणि प्रजा असंतुष्ट व नाखुष होती. तथापि या समयीं ग्रीक वीर शिकंदर यानें हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हां हा वंश बराच बलाढ्य होता.

शेवटच्या नंदाजवळ वीस हजार घोडेस्वार, दोन हजार रथ, चार हजार हत्ती, दोन लाख पायदळ इतकें सैन्य होतें. आणि त्याचें सैन्यबल व संपत्ति पाहून शिकंदराचें सैन्य तर घाबरून परत गेलें. याच वंशांतील एक राजपुत्र चंद्रगुप्त यानें आपला ब्राह्मण मंत्री 'चाणक्य' याच्या नीतिनिपुण सहाय्यानें मगधाचें राज्य आत्मसात् केलें.

यानें शिकंदराची सेना पंजाबांतून हांकून लावली व नंतरही सेल्यूकसचा पाडाव केला. या बलाढ्य महाराजांचा इतिहास देण्याचे अगोदर शिकंदरच्या स्वारीचा वृत्तांत देणें योग्य आहे.



विजिगीषु सिकंदर.



आर्यपुत्र दारा.

## बलाढ्य शिकंदराची स्वारी ( ३२६–३२५ खि. पू. )

७ शिकंदर—खि.पू. ४००च्या सुमारास ग्रीस देशाचें वैभव, समृद्धि, तत्त्वज्ञान व शौर्य केवळ अद्वितीय होतें. कालचक्राच्या दुर्दैवी परिभ्रमणामुळें या देशाचें प्रजासत्ताक राज्य नष्ट झालें, कारण मॅसिडोनियाचा सम्राट् फिलिप यानें हा सर्व देश आपल्या साम्राज्यास जोडला. जगद्विख्यात तत्त्ववेत्ता सॉक्रेटीस हा याच्या दरबारचें एक अमूल्य रत्न असून फिलिपचा मुलगा शिकंदर याचा शिक्षक तोच होता. विसाव्या वर्षीच शिकंदर ग्रीसच्या गादीवर बसला आणि साऱ्या पृथ्वीला जिंकण्याची प्रचंड तयारी करूं लागला. आपल्या बुद्धिमत्तेच्या, शौर्याच्या आणि निर्भयतेच्या उदाहरणानें व सामर्थ्यानें त्यानें आपल्या सैनिकांत असें तेजस्वी शौर्य निर्माण करून सोडलें कीं, भ्याडांतून मर्द आणि कोल्ह्यांतून सिंह निर्माण झाले. विद्युल्लतेच्या आणि वज्राघाताच्या तेजस्वी चपळाईनें त्यानें मिसर, एशिया, कोचक, इराण, तुर्कस्थान आणि अफगाणिस्थान या देशांच्या राजांना धुळीस मिळवून त्यांचीं राज्यें आपल्या साम्राज्यांत सामील केलीं, आणि सुवर्णभूमि आर्यावर्ताच्या विजयार्थ हिन्दुकुश ओलांडून आला.

त्यावेळीं भारतवर्षाची राष्ट्रीय स्थिति अत्यंत शोचनीय होती. केवळ उत्तरेंतच जवळ जवळ १५० राज्यें असून त्यांतील कांहीं प्रजासत्ताक, कांहीं प्रधानमंडळ आणि पंचायतींच्या तंत्रानें चालणारीं, कांहीं स्वतंत्र राजांच्या छत्राखालचीं अशीं होती. या सर्वांत बलिष्ठ असें काय तें मगधाचेंच राज्य होतें. पण तेथेंहि राजा शूद्र असल्यानें प्रजा असंतुष्ट होती.

इतर राजेरजवाडे आणि जातीहि आपापसांत भांडत होत्या. अशा स्थितींत विजय मिळविणें शिकदराला मुळींच कठीण नव्हतें. यामुळें तो प्रख्यात जेता हिंदुकुशापासून सतलज आणि सतलजपासून सिंधुमुखापर्यंत सारा देश जिंकत गेला. ( सोबतचा नकाशा पहा. )

८ तक्षशिला, मंगळोर आणि महावन यांचा पाडाव—भिन्न भिन्न शस्त्रास्त्रें आणि पोलादी कवचानीं सुसज्जित, असें पन्नास हजार सैन्य घेऊन अनेक घोर युद्धें जिंकलेला, महानुभवी, धीरवीर शिकंदर भारतवर्षांत

आला. बऱ्याच छोट्या छोट्या राजांनीं लढाईच्या भानगडींत न पडतां त्याच्या आधिपत्याचा स्वीकार केला. यामध्यें तक्षशिलेचा ( हसन अब्दालचा ) राजा अट्टमी हाही एक होता. आर्यावर्ताचा हा कुपुत्र आपला शत्रु जेहलमाधिश पोरस याच्या नाशार्थ शिकंदराला सर्व प्रकारचें सहाय्य करण्याला उद्युक्त झाला आणि अशारीतीनें त्यानें आपला दुष्ट मनोरथ सिद्धीस नेला. शिकंदरानें स्वतः नदीकांठचे मंगलोर आणि महावन हे अजिंक्य किल्ले सर केले. परंतु या लढाईत आर्यांनीं जें शौर्य गाजविलें त्यावरून शिकंदराची खात्री पटली कीं भारतवर्ष जिंकणें म्हणजे कांहीं अगदीं सोपें कार्य नव्हे.

९ **पोरसचा पराभव**—प्रसंग आणीबाणीचा होता. देशाची लाज राखण्याकरतां पंजाबचा वीर राजा पोरस यानें जेहलम नदीवर शिकंदराच्या स्वारीला तोंड देण्याचें धाडस केलें. पण घनघोर अंधःकार, मुसळधार पाऊस, तुफान, फुगलेली नदी, यांची पर्वा न करतां, मध्यरात्रीस कोणाला न कळत, शिकंदर नदीपार झाला आणि सकाळीं इतक्या वीरश्रीनें लढला कीं, त्यांत पोरसचा पूर्ण पराजय झाला. ९००० क्षत्रियांनिशीं त्याला पकडून शिकंदरासमोर आणण्यांत आलें. शिकंदरानें त्याला विचारलें, 'क्षत्रिय वीरा, तुला मी कसें वागवावें'? पोरसनें त्वरित उत्तर दिलें, 'राजानें राजाला जसें वागवावें तसें.' या उत्तरानें शिकंदर फार खुष झाला आणि पोरसला त्यानें त्याचें राज्य परत दिलें एवढेंच नव्हे तर, तेव्हांपर्यंत जेहलमपासून रावीपर्यंतच्या टापूंतील ज्या चाळीस नगरांनीं शिकंदरचें स्वामित्व मान्य केलें होतें त्या सर्वांचें आधिपत्यही त्यानें पोरस राजाला मोठ्या औदार्यानें बहाल केलें, आणि परत जातेवेळीं तर सतलजपर्यंतचा सर्व प्रांत त्याच्या हवालीं केला. या प्रांतांत दोन हजार मोठीं शहरें असून सात स्वतंत्र जाती राज्य करीत होत्या. देशांमध्यें शांतता राहण्याकरतां त्यानें तक्षशिलेच्या राजाला सिन्धु आणि जेहलममधला दुआब दिला आणि दोघां राजांची मैत्री जुळवून आणिली.

१० **सतलजपासून परत**-मध्यवर्ती देश ताब्यांत घेऊन शिकंदर सतलजपर्यंत पुढें आला. चंद्रगुप्ताच्या प्रेरणेनें त्यानें पुढेंही मगध देशांत

प्रवेश केला असता, परंतु शिकंदरानें खूप प्रयत्न करून पाहिले तरी त्याच्या ग्रीक सैन्यानें इतःपर पुढें जाण्याचें साफ नाकारलें. कारण आपल्या देशाच्या बाहेर सलग आठ वर्षें राहून एकसारखें लढण्याचा त्यांना कंटाळा येऊन गेला होता. आपल्या सैन्याची ही दशा पाहून शिकंदराला फार वाईट वाटलें; पण करतो काय ? सतलजच्या पलीकडे आपले विजय-चिन्ह स्मारक करून जेहलम नदीच्या बाजूनें तो परत फिरला.

११ पश्चिमपंजाबचा विजयः—त्यावेळीं पंजाबांतील दुआबप्रदेशांत सिबोई, अगलासोई, मलोई, ऑक्सिड्राकोई इत्यादि जातींचें वास्तव्य होतें. सर्वांनीं मिळून शिकंदराशीं सामना करावा अशी त्याची इच्छा होती, परंतु शिकंदरानें आपल्या बुद्धिकौशल्यानें आणि भेदनीतीनें पहिल्या दोन जातींना एकत्र येऊंच दिलें नाहीं आणि मग स्वतंत्र रीत्या प्रत्येकीचा पराभव करून टाकला. अगलासोई जातीच्या वीस हजार वीरांनीं आपल्या स्त्रियासमवेत मुलाबाळांसह अग्निप्रवेश केला, पण शत्रूच्या हातीं आपणांस सांपडूं दिलें नाहीं ! मलोई आणि ऑक्सिड्राकोई याही जाती एक होऊं शकल्या नाहींत. संयुक्त सैन्याचा सेनापति कोणत्या पक्षाचा याबद्दलच त्यांच्यांत तंटा उडाला. याच तंट्याचा शिकंदरानें फायदा घेऊन मलोईचा नाश केला. शिकंदराचा जय झाला खरा, परंतु तो स्वतः थोडक्यांत बचावला. लढत असतां त्याला एक जोराचा वार लागला आणि त्याचे सैन्य तत्काळ धावून येऊन वेळेवर पोहोचलें नसतें तर त्यांत त्याचा अंतच व्हावयाचा. आपसा-तील दुहीमुळें आमची सुवर्णभूमि यवनांनीं वारंवार लुटली आहे तरी आर्य वंशजांनीं एकीचा धडा अजूनही घेतला नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय. जर मलोई आणि ऑक्सिड्राकोई या जातींमध्यें फूट न पडती तर दोघांच्या जवळ मिळून नव्वद हजार पायदळ, दहा हजार घोडेस्वार आणि आठ नऊशें रथ युद्धाकरितां सज्ज होते आणि एवढ्या सैन्याचा पराभव करणें शिकंदराला खास कठीण गेलें असतें.

१२ सिंधचा विजय—शिकंदराचे वेळीं, सिन्धची राजधानी अरोर होती. तेथें मूसीकैनो नामक एक शक्तिमान् व वीर्यशाली राजा राज्य करीत असे. चांगली लढाई दिल्याशिवाय त्यानें शिकंदराचें आधिपत्य स्वीकारलें नाहीं.

सिंधी आर्यांचे रीतिरिवाज पाहून ग्रीक लोकांना फार आश्चर्य वाटलें; आणि २२०० वर्षांनंतर आज आम्हासही आश्चर्य व कौतुक वाटतच आहे. उदाहरणार्थ पुढील गोष्टी घ्या. (१) मिताहाराच्या जोरावर ते १३० वर्षेपर्यंत जगत. (२) सोनें चांदी विपुल असली तरी या धातू दुःखाचें आणि वैषम्याचें मूळ समजून ते त्यांचा उपयोग करीत नसत. (३) तेथें गुलामगिरीची चाल नव्हती (४) प्रत्येक शहरांतील तसेंच खेड्यांतील सारे नागरिक एकत्र मिळून भोजन करीत असत. खाण्याचे पदार्थ शिकार करून आणलेले असत. (५) वैद्यकाशिवाय दुसरी कसलीहि विद्या ते शिकत नसत. (६) तेथें न्यायकोर्टें नव्हतीं कारण भांडण तंटेच होत नसत. एकदरींत ते लोक आचाराविचारानें पूर्णपणें समतावादी असून आमचें सध्यांचें ध्येय त्यांनीं गांठलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**१३ शिकंदर परत फिरतो**—या प्रकारें सिंधप्रांत काबीज करून शिकंदरानें परत जाण्याची तयारी केली. त्यानें निआर्कसली यास अरबी समुद्राच्या मार्गानें इराणास जाण्याची आज्ञा दिली, आणि स्वतः बलुचिस्थानच्या जंगलांतून आपल्या सैन्यासह मोठ्या कष्टानें वाट काढून इराण गांठलें. अर्थात् नवीन विजय संपादून शिकंदरानें या कष्टांचें परिमार्जन केलें असतेंच, परंतु ३२३ खि. पू. मध्येंच तो अकालीं वारला.

**१४ शिकंदराच्या विजयाचा प्रभाव**—हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जरी शिकंदर फार बलाढ्य, मुत्सद्दी आणि निर्धास्त असा नरसिंह होता तरी त्या वेळचा भारतवर्ष हाही कांहीं भित्रा अगर दुबळा नव्हता. त्याचा पराभव झाला तो केवळ दुहीमुळें. आणि पराजय झाला तरी शिकंदराशीं झालेल्या ठिकठिकाणच्या युद्धांत भारतीय योद्ध्यांनीं जो अद्भुत पराक्रम दाखविला तसा इतर कोणत्याही जातीनें दाखविला नव्हता. विद्युल्लतेच्या चपलाईनें मजला मारणाऱ्या शिकंदराला हिंदुकुशापासून सिंधप्रांतीं पोहोंचण्यास दहा महिने लागले आणि सिंध व सतलज यांच्या मधील देश जिंकण्यास नऊ महिने लागले. मिसरपासून हिंदुकुशापर्यंतचे सर्व राजे त्यानें जमीन-



**इराणी पोषाखांत सिकंदर बादशहा.**

( प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझिअम. मुंबई )

[पृष्ठ ५१]

दोस्त केले, पण येथील एकहि राज्य नाहींसें झालें नाहीं. अलेक्झांडर गेल्यावर थोडक्याच अवधींत सर्व राज्यें पूर्ववत् जोमदार झालीं व सेल्युकसची स्वारी आली तेव्हां त्यांनीं तिला थेट अफगाणिस्थानापलीकडे पिटाळलें. यावरून असें दिसून येईल कीं, ग्रीक बादशहा उत्तर भारतवर्ष जिंकून गेला असा डंका चोंहींकडे वाजला तरी वस्तुतः भारताच्या अंतस्थ शक्तीला पराभवाचा स्पर्शहि झाला नाहीं. यामुळें ग्रीक लोकांना येथील लोकांवर आपल्या संस्कृतीची कसलीहि छाप बसवितां आली नाहीं. शिकंदर जगला वांचला असता, आणि ग्रीक सैन्याचें भारतवर्षांत वास्तव्य झालें असतें तर, कदाचित् आमचा इतिहास निराळा झाला असता. परंतु एकादी वावटळ यावी आणि कांहीं कालानें लगेच विरून जावी त्याप्रमाणें शिकंदराची स्वारी आली व गेली. तिचा भारतवर्षावर स्थायिक असा प्रत्यक्ष परिणाम कांहींच झाला नाहीं. अप्रत्यक्ष असे मात्र कांहीं परिणाम झाले. या स्वारीमुळें भारतवर्ष व युरोप यामध्यें तीन स्थलमार्ग व एक जलमार्ग असे चार दळणवळणाचे मार्ग उघडले गेले. पश्चिम आशियांत ग्रीक राज्य स्थापन झाल्यानें भारतवर्ष व ग्रीस यांमध्यें विचारविनिमय व व्यापार अधिक होऊं लागला. ग्रीकांच्या देवता व त्यांच्यामूर्ति महायान बौद्धधर्मांत शिरल्या, व उलट बौद्ध कल्पना पश्चिमेंत शिरून ख्रिस्तधर्माची भूमिका तयार करूं लागल्या. ग्रीक नाट्य व शिल्प कलांची वायव्येच्या भारतीयांना ओळख झाली आणि भारतीय तत्त्वज्ञान आणि ललितकला पश्चिमेकडे वाहूं लागल्या.

## मौर्य वंश.

१५ **मौर्यवंशाची प्रसिद्धि**—चंद्रगुप्ताच्या आईचें नांव मुरा. म्हणून त्याला चंद्रगुप्त मौर्य म्हणतात. याच्या वंशांत दहा राजांनीं ख्रि. पू. ३२१ ते १८४ पर्यंत राज्य केलें. हा वंश प्रसिद्धीस येण्याचीं कारणें:—(१) भारतवर्षाचा निश्चित असा इतिहास या वंशापासूनच मिळतो. (२) याचा युरोपाशीं निकट संबंध होता. (३) यानें सर्व उत्तर हिंदुस्थान आपल्या एकछत्री साम्राज्याखालीं आणिलें. (४) बौद्धधर्माचा स्वीकार केला. (५) याची शासनपद्धति सुव्यवस्थित आणि उत्तम होती.

## चंद्रगुप्त ( ख्रि. पू. ३२१–२९७. )

१६ पूर्वी सांगितलेंच आहे कीं, महापद्म नंदाच्या अत्याचारामुळें चंद्रगुप्त मौर्य पंजाबांत पळून आला होता. शिकंदराच्या सहाय्यानें मगधावर स्वारी करण्याचा त्याचा बेत फिसकटला, परंतु तो ग्रीक विजेता भारतवर्षांतून परत गेला, तेव्हां बुद्धिमान्, मुत्सद्दी, देशहितैषी आणि पराक्रमी चंद्रगुप्ताने पुष्कळ सैन्य जमविलें आणि पंजाबांतून ग्रीक लोकांना हांकून देऊन तेथे तो निर्धास्तपणें राज्य करूं लागला. आणि महापद्माच्या प्रजेच्या असंतोषाची संधि साधून सुप्रसिद्ध मुत्सद्दी चाणक्य (अथवा कौटिल्य) याच्या मदतीनें ३२१ ख्रि. पू. मध्यें त्यानें मगधावेही राज्य पटकाविलें.

१७ चंद्रगुप्ताचें कार्य–१त्याने ग्रीक लोकांना पंजाबांतून काढून लावलें. २ त्यानें आपले राज्य साऱ्या उत्तर हिंदुस्थानांत बिहारपासून हिंदुकुशापर्यंत पसरविलें. (३) त्यानें सिंधुनदीपलीकडचा प्रांत ग्रीकांपासून परत जिंकून घेतला; आणि जेव्हां शिकन्दराच्या नंतरचा पश्चिम आशियाचा अधिपति सेल्युकस् निकेटर यानें शिकंदराप्रमाणेंच आमच्या देशावर ख्रि. पू. ३०५ मध्ये स्वारी केली, तेव्हा चंद्रगुप्ताने त्याचा पराजय केला, आणि त्याला तह करण्यास भाग पाडिलें. सेल्यूकसनें ॲरॅचोसिया व जेड्रोशिया हे विस्तीर्ण प्रान्त व आपली मुलगीहि चंद्रगुप्ताला दिली आणि चंद्रगुप्तानें ग्रीक राजाला ५० हत्ती देऊन आपल्या दरबारांत एक ग्रीक वकील ठेवून घेण्याचें कबूल केलें. (४) चंद्रगुप्तापाशीं सात लाखांवर सैन्य होतें. यांत आरमारहि असून सर्व सैन्याची शिस्त व व्यवस्था अति उत्कृष्ट होती. (५) त्याच्या अधिकारीवर्गानें खेडेगांवाची आणि शहरांची सर्व व्यवस्था दक्षतेने आणि तत्परतेनें ठेविली होती. (६) त्याच्या राज्यांत शेती आणि व्यापार सुरक्षित असून त्यांची व्यवस्था चांगल्या तऱ्हेनें ठेविली जात होती. (७) तलाव आणि कालवे खोदून त्यानें पाण्याची व शेतींची उत्कृष्ट सोय केली होती आणि जंगलांचेंही संरक्षण केलें होतें. (८) चंद्रगुप्ताच्या दरबारांतील ग्रीक वकील मेग्यास्थेनीस यानें लिहून ठेविलें आहे कीं, पाण्याच्या भरपूर पुरवठ्यामुळें त्यावेळीं दुष्काळ कधींही पडत नसे. त्या काळीं पिकाऊ जमिनीजवळ लढाया

होत असत, तरी शिपाई लोक शेतीचें नुकसान करीत नसत. एकंदरींत चंद्रगुप्ताच्या हिंदू राज्याचें सामर्थ्य, त्याचा विस्तार, त्यांत वाटणारी सुरक्षितता, तसेंच तत्कालीन शेती आणि पाट-बंधाऱ्याची उत्कृष्ट सोय व व्यवस्था इत्यादि गोष्टींचें वर्णन वाचून प्रत्येक हिंदूला अभिमान वाटल्याशिवाय रहात नाहीं.

१८ चंद्रगुप्ताच्या राज्यव्यवस्थेचें वर्णन.

(१) नगर-सभा आणि ग्रामपंचायती-मेग्यास्थेनीसच्या वृत्तांतावरून खात्रीलायख समजतें कीं, पाटलिपुत्र, तक्षशिला, उज्जैनी, तोसली इत्यादि मुख्य मुख्य नगरांमध्ये खालील प्रकारची व्यवस्था होती:—
ज्या लोकांच्या हातांत नगराची व्यवस्था असे त्यांच्या सहा पंचायती अगर पोट कमिट्या असत. या पोटकमिट्यांत प्रत्येकीं पांच पांच सभासद असून त्यांच्याकडे परदेशीयांचें आदरातिथ्य, व्यापाराची वृद्धि, संरक्षण, कर वसुली, खानेसुमारी, कारखान्यांची देखरेख इत्यादि कामें असत. (२) खानेसुमारी केवळ कर वसूल करण्याकरतां केली जात नसून देशांतील प्रजेच्या जनन-मरणावर लक्ष रहावें हाही तिचा उद्देश होता. चंद्रगुप्ताचे वेळीं खानेसुमारी करण्याची रीति आश्चर्यकारक होती. पाश्चात्य लोकांचा या गोष्टीवरच विश्वास बसत नाहीं, कारण युरोपांत मुळीं खानेसुमारीचा प्रघात सुरू होऊन थोडीं वर्षे झालीं, आणि आहे त्या पद्धतींत अजून अनेक दोष आहेत चंद्रगुप्ताचे वेळीं ही पद्धत इतर कोणत्याही सुधारलेल्या राष्ट्रांत प्रचलित नव्हती. यावरून चंद्रगुप्ताच्या राज्यपद्धतीची थोरवी व्यक्त होते. (३) सैन्यव्यवस्था इतकी चोख होती कीं, आज त्याचें आश्चर्यच वाटतें. लष्कर आणि आरमार या दोन्हीवर मिळून ३० अधिकारी होते, व यांच्या व्यवस्थेकरितां स्वतंत्र पोट समित्याहि होत्या. बड्या जहाजांच्या मुख्य दर्यासारंगाच्या मदतीस एक उपसभा, तसेंच युद्धसामुग्रीवर देखरेख करणारा आणि तिच्या वाहतुकीची व्यवस्था पाहणारा एक मुख्याधिकारी, (हल्लींचा Quarter Master General) असून त्याच्या मदतीस दुसरी उपसभा, याप्रमाणेंच पायदळ, घोडदळ, रथदल आणि हत्तीस्वार यांच्याकरतां ४ स्वतंत्र अधिकारी व उपसभा होत्या.

सैन्यव्यवस्थेचे इतर भाग–विभागहि आश्चर्यकारक कुशलतेनें पाडले होते. ही रचना पुढें कायम टिकली असती तर हिंदु राजांचा विदेशीयांकडून कधींच पराभव होण्याची पाळी आली नसती. अर्थात् चंद्रगुप्ताचे वेळीं ही व्यवस्था उत्कृष्ट असून अत्यंत कार्यक्षम होती.

नगरव्यवस्था व सैन्यव्यवस्था पाहणाऱ्या अधिकाऱ्याव्यतिरिक्त तिसऱ्याही प्रकारचा एक अधिकारीवर्ग होता. त्याजकडे शेती, पाणीपुरवठा, जंगल आणि खेडीं यांची व्यवस्था असे. जमिनीची मोजणी होत असून जंगलांतील शिकारीचेही नियम असत. अर्ध्या अर्ध्या कोसावर मैलांचे दगड असत. वरील हकीगतीवरून चंद्रगुप्तकालीन संस्कृति किती उच्च दर्जाची होती हें समजून येईल. सुधारणेची ही पायरी गांठण्याकरितां शेंकडों वर्षांची आवश्यकता असते. आणि चंद्रगुप्ताच्याही पूर्वी हजारों वर्षे नांदत असलेल्या एका अनुपम संस्कृतीचीं चिन्हें संस्कृत वाङ्मयांत सांपडतात. यावरून असाच निष्कर्ष निघतो कीं, या अद्वितीय संस्कृती भारतवर्षीयांनीं मिसर अगर युनानी लोकांपासून उचलल्या नसून त्यांचा विकास त्यांनीं स्वयंस्फूर्तीनें आणि स्वबुद्धीनेंच केला असला पाहिजे.

१९ **लोकव्यवस्था**—त्यावेळीं जनतेमध्यें सात प्रमुख वर्ग होते. १ **तत्त्वज्ञ**–यांजवर सार्वजनिक कर्तव्यांचा बोजा नसे. हे नोकरीहि करीत नसत, आणि नोकरहि ठेवीत नसत व त्यांचा दर्जा सर्वांत उच्च असे. २ **कृषीवल**–शेतकरी, यांच्या संरक्षणार्थी विशेष काळजी घेण्यांत येत असून हेहि लष्करी नोकरी किंवा इतर सार्वजनिक कर्तव्यें यांपासून मुक्त होते. ३ **वनचर**–हे कोठेंहि स्थायिक असे रहात नसून नेहमीं छावण्यांतच रहात असत. ४ **शिल्पज्ञ**–हे करापासून मुक्त असत; एवढेंच नव्हे तर यांना राजाश्रयही असे. ५ **सैनिक**–यांचा सर्व खर्च सरकारांतून होत असे. ६ **वार्ताहर**–हे बातमीदारांचें काम करीत. ७ **मंत्री**–सल्लागार हे कार्पोरेटर्स किंवा असेसर्स, पंच यांच्याप्रमाणें सार्वजनिक कार्य करीत असत.

२० **आर्यांची संस्कृतिः**—शांतताप्रिय आणि न्यायप्रिय भारतवर्षीयांचे मेग्यॉस्थिनीस यानें केलेलें पुढील वर्णन प्रत्येक हिंदूला अभिमान वाटण्या-

अशोकाचा स्तम्भ

आणि

बार्हुतचें द्वार.





सारखें आहे. तो म्हणतो, " ते मोठ्या सुखानें रहात असून सरळ आणि मितव्ययी आहेत. यज्ञप्रसंगांशिवाय ते दारू पीत नाहींत. ते तांदुळापासून दारू तयार करतात. त्यांचा साधेपणा आणि सचेपणा यावरूनच स्पष्ट होतो कीं, ते न्यायकोर्टांत अगदींच क्वचित् जातात. गहाण, ठेव वगैरे व्यवहारासंबंधीं कधींहीं दावा लावावा लागत नाहीं आणि त्यांना स्टांपाची आणि साक्षीदारांची जरूरी नसते. दुसऱ्यावर त्यांचा विश्वास असतो. ते घर उघडें टाकून बाहेर जातात. यावरून त्यांचा धीरस्वभाव कळून येईल. ते सत्याला व धर्माला फार मान देत असत. यामुळें वृद्धलोक विशेष बुद्धिमान् नसल्यास त्यांना ते अधिकार देत नाहींत. आर्यलोक परदेशीयांनाही गुलाम करीत नाहींत, मग स्वदेशीयांना कसे करतील ? त्यांच्यांत चोरी क्वचितच होते."

२१ कलाकौशल्यः—भारतीय कलाकौशल्याच्या उत्तम उत्तम वस्तू इसवी सनापूर्वी एक हजार वर्षे पूर्व फिनिशियाच्या व्यापाऱ्यांना परिचित असून त्या पश्चिम आशियाच्या व मिसर देशाच्या बाजारांत जात असत. मेग-स्थिनीस म्हणतो कीं, " भारतवासी लोक कलाकौशल्यांत फार चतुर आहेत. उत्तम हवापाण्याच्या देशांतील लोक असे असणारच. त्यांच्या कपड्यावर जरतारी काम केले असून रत्नें बसाविलेलीं असतात. ते सर्वोत्कृष्ट तलम मलमलीचे फुलदार असेंहि कपडे वापरतात. त्यांचे नोकर त्यांच्यावर छत्र्या धरतात. सौंदर्याकडे त्यांचें विशेष लक्ष असून त्याकरतां ते हरप्रकारचे उपाय योजतात."

२२ परदेशीय व्यापारः—त्यावेळीं ग्रीस आणि रोम एकापेक्षां एक सुधारलेले होते तरी कारागिरीमध्यें त्यांना भारतीयांची सर आली नव्हती. हस्तिदंत, नीळ, टिन, साखर, रेशमी आणि कापसाचें कापड, तसेंच नानाप्रकारचे मसाले भारतवर्षातूनच ग्रीस देशांमध्यें जात असत. परंतु रोममध्यें तर वरील पदार्थांशिवाय मलमल, चिटें, औषधें, सुगंधि पदार्थ लाख, पोलाद, माणिक, इंद्रनीळ, इतर प्रकारचीं रत्नें आणि मोतीं वगैरे पदार्थ विक्रीकरितां पाठविले जात. जरतारी काम केलेलें कापड तर त्या वेळीं फार प्रसिद्ध होतें. रोममधील धनाढ्य शोकी स्त्रीपुरुष तें कापड

इतक्या हौसेनें वापरीत कीं, तें प्रत्यक्ष सोन्याच्या भावानें विकलें जात असे. प्रसिद्ध इतिहासकार प्लिनी हा लिहितो कीं, 'रोमच्या पैशाची भारतवर्षांत नुसती धार लागली आहे.' त्यावेळीं रोममधून कमींत कमी चाळीस लक्ष पौंड हिंदुस्थानांत येत. एक वेळ तर या व्यापारांत रोमला असा धक्का बसला कीं, त्याचा व्यापार सारा डबघाईस आला. तेव्हां त्यांनीं कायदे करून भारतवर्षाच्या मालावर बहिष्कार घातला. एवढा अवाढव्य व्यापार चालविण्याकरतां व त्याचें संरक्षण करण्याकरतां त्या-वेळीं मोठें आरमार होतें हें वर सांगितलेच आहे. जलमार्गानें हा व्यापार चालला असतांना स्थलमार्गावरील व्यापार बंद नव्हता. काबूल, बलख, काशगर, गोबी, खोतान वगैरेवरून हजारो मैलांचा प्रवास करून भारतीय व्यापारी चीनच्या राजधानी (पेकीन) पर्यंत जात असत व चिनी व्यापारी व यात्रेकरू त्याच मार्गानें येथें येत असत.

२३ मिरवणूक--स्ट्रॅबोनें एका भपकेदार मिरवणुकीचें वर्णन केलें आहे. मेगॅस्थेनीस यानेंही पाटलिपुत्राच्या रस्त्यात तोच प्रकार पाहिला असला पाहिजे. इ. स. च्या सातव्या शतकांत ह्यूएन्त्संगनेंहि याप्रमाणेंच साक्ष दिली आहे. तो म्हणतो, "धर्मोत्सवकालीं मिरवणुकी निघत; त्यामध्यें सोन्याचांदीच्या अलंकारांनीं सजविलेल्या हत्तींच्या अनेक रांगा असत. चार चार घोड्यांच्या आणि अनेक जोड्यांच्या बैलांच्या गाड्याहि खूप असत. याच्या मागेंपुढें सुंदर पोशाख केलेले असंख्य नोकरचाकर असून त्यांच्या हातांत सुवर्णाचे कलश, कटोरे, छोटी टेबलें, तांब्याचे पेले वगैरे नानाप्रकारचीं भांडीं असत. भांड्यावर जडावाचें काम केलें असून त्यांत पन्ना, फिरोज, माणिक इत्यादि हरतऱ्हेचीं रत्नें झळकत. मागून सिंह, वाघ, चित्ते, वगैरे जंगली वन्य जनावरांचे आणि मधुरालाप कर-णाऱ्या विविध पक्ष्यांचे पिंजरे जात." कोल्हापुरसारख्या संस्थानांमधील मिरवणुकींना आजहि हें वर्णन बरोबर लागू पडतें. आपली परंपरा कशी दीर्घ व अखंड असते याचें हें एक आश्चर्यकारक उदाहरण आहे.

२४ पाटलिपुत्र-चंद्रगुप्त महाराजाची राजधानी. हें नगर ९ मैल लांब व दीड मैल रुंद असून याच्या सभोंवतीं भक्कम लांकडी कोट होता.

तटाला ५७० बुरूज असून ६४ वेशी होत्या. कोटाबाहेर शोण नदीच्या पाण्यानें भरला जाणारा, ६०० फू. रुंद व ४५ फू. खोल असा एक विशाल खंदक होता. राजवाडा लांकडीच असला तरी त्यांत सौंदर्याची परमावधि झाली असून असा वाडा इराणांत अगर ग्रीसमध्येंहि नव्हता. महालांचे खांब सोन्यानें मढविलेले होते व त्यावर सुंदर द्राक्षांचे वेल चढविले असून चांदीचे चित्रविचित्र पक्षिगण बसविले होते. वाड्याभोंवतीं एक विस्तीर्ण बगीचा असून त्यांत डोलणाऱ्या नाना प्रकारच्या लतावृक्षांनीं त्याला अपूर्व शोभा आणिली होती. मध्यंतरीं अनेक जलाशय असून त्यांतील रंगीबेरंगी मासे आणि इतर जलचर सर्व शोभेंत आणखी भर घालीत. ऑगस्टस्चें रोम व पेरिक्लिस्चें अथेन्स यापेक्षां पाटलिपुत्र निदान चौपट विस्तीर्ण होतें. त्यावेळीं याच्याइतकें अवाढव्य नगर जगांत एकही नव्हतें. असें असूनही तेथील नगरसभेचे काम समाधानकारक रीतीनें चाले. तेव्हां पाश्चात्य राजधान्यांच्या चौपट प्रान्ताचा कारभार करणारे नागरिक कुशल व कर्तृत्ववान् असले पाहिजेत यांत संशय नाहीं.

२५ चंद्रगुप्ताचा दरबार—या दरबारचीही शोभा सर्वस्वीं अपूर्व अशीच होती. तिचा थाट काय वर्णावा ? सहा सहा फूट रुंदीचीं चित्रविचित्र कलाकुसर केलेलीं रत्नजडित सुवर्णासनें व सुवर्णपात्रें, अनेक प्रकारचीं सोन्याचीं व तांब्याची पात्रें, नाना वर्णांचीं उंची वस्त्रें यांनीं दरबार नुसता फुललेला असे. अनेक मौक्तिकमाला लटकत असलेल्या सोन्याच्या पालखींतून राजा दरबारांत येत असे, अगर क्वचित् प्रसंगीं मल्लयुद्ध अगर पशूंच्या झुजा, टकरा अगर घोड्यांच्या शर्यतीहि पाहण्यास जात असे. त्याचा पोषाख भरजरीच्या तलम मलमलीचा असे. वरील वर्णन एका परदेशस्थ इतिहासकाराच्या लेखणींतून उतरलेलें आहे. याच्याच जोडीनें लंका, अयोध्या, हस्तिनापूर वगैरे ठिकाणांच्या दरबारांचीं प्राचीन कवींनीं केलेलीं वर्णनें वाचलीं म्हणजे त्यांत अतिशयोक्ति नाहीं याची प्रचीति येते. आणि प्रस्तुत वर्णनावरून असा दृढ विश्वास वाटतो कीं, चंद्रगुप्ताच्याही पूर्वी हजारों वर्षें अशीच किंबहुना याहिपेक्षां उच्च अशी संस्कृति आणि समृद्धता भारतवर्षांत नांदत होती.

२६ बिंदुसार—चंद्रगुप्ताच्या पश्चात् त्याचा पुत्र बिंदुसार यानें २५ वर्षें राज्य केलें. (१) यानें आपल्या बापाच्या राज्याचें चांगल्या प्रकारें रक्षण केलेंच, पण शिवाय त्याचा मद्रासपर्यंत दक्षिणेंत विस्तार केला. (२) खि. पू. २८० मध्यें सेल्यूकसृहि मरण पावला, आणि त्याचा मुलगा अँटिओकस् सार्टर पश्चिम आशियाचा अधिपति झाला. त्यानें आपल्या बापाचेंच धोरण राखून आपला वकील बिंदुसाराच्या दरबारांत पाठविला. अशा रीतीनें या दोन राजांचा चांगला स्नेह होता. बिंदुसारानें सार्टरकडून द्राक्षें, दारु, अंजीरें, आणि एक 'प्रोफेसरं' मागविला होता. (३) मिसरचा बादशहा टॉलेमी फिलेडेल्फस् यानेंहि बिंदुसाराचा स्नेह जोडून आपला वकील डायोनीयस् यास त्याच्या दरबारीं पाठविलें. अशा रीतीनें मोठ्या शौर्यानें आणि प्रसिद्धीनें बिंदुसारानें २७२ खि. पू. पर्यंत राज्य केलें.

## सम्राट् अशोक ( २७२–२३२ खि. पू. )

२७ अशोकाच्या कीर्तीचें रहस्य—अशोकाचें नांव भारतीय इतिहासांत अक्षय्य सुवर्णाक्षरांनीं कोरलेलें राहील. याचें कारण केवळ त्याचा पराक्रम अगर राज्यविस्तारच नाहीं, तर त्यानें परंपरागत वैदिक धर्म सोडून आपल्या प्रजेला एक नवीन धर्ममार्गावर आणून सोडलें. त्याच्या उन्नतिप्रीत्यर्थ अविश्रान्त परिश्रम घेतले, आणि स्वतः लोकोत्तर धर्मनिष्ठेचें व स्वार्थत्यागाचें एक मूर्तिमंत उदाहरण होऊन राहिला. थोडक्यांत अनेक प्रकारें प्रजेच्या कल्याणार्थ सत्कार्यें करण्यांत आपला देह झिजविला म्हणून त्याच्या कीर्तीचा निनाद आज दोन हजार वर्षें दुमदुमत राहिला आहे. कोणत्याहि भारतीय सम्राटाचें, प्रत्यक्ष महाराज विक्रमादित्य याचेंहि नांव उत्तर रशियापासून तो थेट लंकेपर्यंत कोठेंहि इतकें पूज्य मानलें जात नाहीं.

२८ चरित्र—हा प्रतापी राजा सुभद्रांगी नामक एका ब्राह्मण राणीचा मुलगा. तरुणपणीं तो अति क्रूर व उपद्रवी असे. म्हणून रागावून बापानें त्याला तक्षशिलेमधील विद्रोहाच्या पारिपत्यार्थ पाठविलें. ते कार्य यशस्वी करून दाखविल्यावर, त्याला उज्जयनीचा प्रान्तिक अधिकारी अगर सुभेदार नेमण्यांत आलें. बाप वारल्यानंतर तो गादीवर बसला. अशा एक प्रवाद

आहे कीं, त्यानें आपल्या भावांना मारून राज्य बळकाविलें, परंतु तो साफ खोटा आहे. राज्याभिषेकानंतर नऊ वर्षांनीं आणि कलिंग देश जिंकल्यानंतर लगेच त्यानें बौद्धधर्माची दीक्षा घेतली. कारण कलिंगयुद्धामधील क्रूरपणा, घात आणि गुलामागिरी पाहून त्याचें हृदय द्रवलें आणि गौतमबुद्धाच्या दयायुक्त, सात्विक धर्माचा स्वीकार करण्याची त्याला बुद्धि झाली. याच सुमारास त्यानें चण्ड नांवाच्या ठिकाणीं ' देवानां प्रिय ' हें बिरुद धारण केलें.

२९ कालिंगचा विजय—(खि. पू. २६१ ) हा देश महानदी आणि गोदावरी यांच्यामध्यें असून आज तो उत्तर सरकार या नांवानें ओळखला जातो. कालिंग राजाजवळ साठ हजार पायदळ, एक हजार घोडेस्वार आणि सातशें हत्ती इतकें सैन्य असूनहि मगध सैन्याच्या मानानें तें फार कमजोर पडलें. बलाढ्य अशोकाच्या सेनेपुढें त्याचा टिकाव लागेना. अनेक लढायांत त्याचा पराभव झाला. या युद्धांत अजमासें १लाख माणसें मेलीं, १॥लाख माणसें गुलाम बनलीं आणि शिवाय या युद्धामुळें असा दुष्काळ पडला आणि असे रोग उत्पन्न झाले कीं, त्यांनींच कितीतरी लाख माणसांचा बळी घेतला. यामुळें वर उल्लेख केल्याप्रमाणें अशोकास बेसुमार दुःख झालें. शोक, पश्चाताप आणि ग्लानि यांनीं त्याचें हृदय पिळवटून निघालें आणि त्यांतून दयेचे व कोमलतेचे पाझर फुटले. देशविजयार्थ पुन्हां कधींही युद्ध करणार नाहीं अशी प्रतिज्ञा त्यानें केली आणि सत्यानें, प्रेमानें आणि धर्मानें मानवांचीं हृदयें जिंकण्याचा बेत केला. या त्याच्या अलौकिक दयाधर्मामुळें त्याचें नांव आज जगतितलावर अमर होऊन राहिलें आहे.

३० अशोकाचा राज्यविस्तार—(१) भारतवर्षाच्या ज्ञात इतिहासांत अशोकाच्या साम्राज्याएवढें विस्तृत साम्राज्य दुसरें कोणाचेंहि नाहीं. वायव्येस हिंदुकुशापर्यंत, पूर्वेस पूर्वबंगाल, कामरूप ( आसाम ) आणि कालिंगपर्वत, दक्षिणेस कृष्णा आणि गोदावरीमधील आंध्रदेशापर्यंत आणि पश्चिमेस थेट काठेवाड, सिंध व बलुचिस्थानपर्यंत इतका राज्यविस्तार होता. थोडक्यांत, अफगाणिस्थानचा बहुतेक भाग, काश्मीर ( याची राजधानी श्रीनगर अशोकानेंच वसविली. ) स्वात, नेपाळ, आसाम आणि कृष्णे-

पर्यंतचा सर्व भारतवर्ष त्याच्या ताब्यांत होता. (२) चोल, पांड्य आणि केरळ देशाचे राजे त्याचे मांडलिक होते. (३) पांच प्रसिद्ध यवन—ग्रीक राजांशीं त्याचा स्नेह असून त्यांच्या देशांत आपले उपदेशक पाठवून तेथेंही त्यानें बौद्धधर्माचा प्रचार केला.

३१ राज्यव्यवस्था—अशोकानें आपल्या राज्यांत नीतिप्रचारार्थ कांहीं विशेष योजना केली होती असें त्याच्या पांचव्या व सहाव्या 'आदेशांवरून समजून येतें.' १ 'आजपर्यंतच्या अधिकाऱ्यांचें वर्तन वाईट होतें' ही गोष्ट त्याला सहन न होऊन त्यानें लोकांच्या नीतिवर व वर्तनावर करडी नजर ठेवण्यासाठीं एक 'धर्ममहामात्र' नामक अधिकारी नेमला. व उच्चनीचभाव न राखता छोट्या बड्या सर्व लोकांच्या सदाचरणावर सर्वप्रकारें त्यांनीं नजर ठेवून धर्मोपदेशानें त्यांना सन्मार्गावर आणणेचा प्रयत्न केला. २–३ याच्याशिवाय वचभूमिक आणि रज्जुक या नांवाचे दोन प्रकारचे अधिकारी असून ते लोकांच्या चालचलणुकांवर लक्ष ठेवीत. ४ रज्जुकांची एक सभाहि स्थापन केली असून त्यांत धार्मिक विषयांचा विचार होत असे. ५ प्रत्येक प्रान्तावर एक प्रान्तिक अधिकारी नेमला होता. ६ या अधिकाऱ्यांच्या कार्याचा विचार करण्याकरतां महामात्र नांवाचा स्वतंत्र अमात्य नेमला होता. अत्यवश्यक व महत्वाचीं कामें हा अधिकारी पहात असे. ७ सरहद्दीच्या संरक्षणार्थ व व्यवस्थेकरतां अंतमहामात्र नामक अधिकारी नेमला होता. ८ अंतःपुर-व्यवस्थेकरताहि एक स्वतंत्र अधिकारी होता. त्याला ऐतिह्यक महामात्र म्हणत.

३२ परदेशांत बौद्धधर्म—अशोकाचे वेळीं भिक्षूंची एक सभा भरली. या सभेमध्यें बौद्धधर्माचे संशोधन होऊन एकमत प्रस्थापित झालें. हेंच आज सिंहलद्वीपांत (सिलोनमध्यें) प्रचलित आहे. अशोकाच्या मार्गे जशी राज्याची वाईट अवस्था झाली, तसें बौद्धधर्मांतहि तंटेबखेडे होऊन नाना पंथ आणि नाना मतें उत्पन्न झालीं. बौद्धधर्माचें या कालचें विकृत स्वरूप आज चीन, जपान, तिबेट इत्यादि देशांत दृष्टीस पडतें. अशोककालीन सभेनें धर्मशास्त्रांच्या संशोधनाशिवाय धर्मप्रचाराची एक अशी योजना केली होती कीं, परदेशांतहि उपदेशक पाठवून तेथें प्रचार करावा.

महाराज अशोकास ही कल्पना फार आवडली आणि हिमालयीन, नेपाळ आणि काश्मीरपासून ते थेट लंकेपर्यंत ब्रह्मदेशापासून महाराष्ट्र आणि इराण, सीरिया, ग्रीस आणि मिसर इत्यादि देशांपर्यंत प्रचारक पाठविण्यांत आले. अशोकानें बौद्धधर्मप्रचारार्थ उपयोगांत आणलेल्या अनेक साधनांपैकीं हें एक किरकोळ झालें. याच्याशिवाय महत्वाचीं अशीं अनेक साधनें होतीं तीं थोडक्यांत पुढें दिलीं आहेत. १ त्यानें आपण भिक्षु होऊन सपरिवार देशोदेशीं हिंडून स्वतः धर्मप्रचार केला. २ प्रजेला धर्मपरायण करण्यासाठीं नवीन नवीन अधिकारी नेमले. ३ धर्मोपदेशक योग्य सन्मार्गापासून ढळूं नयेत, याकरतां त्यांच्या सभा बनविल्या आणि अधिकाऱ्यांच्या द्वारें त्यांजवर देखरेख ठेविली. ४ आपल्या सर्व राज्यभर व आपल्या दोस्तराष्ट्रांतहि मठ बांधून बौद्धधर्मप्रचारार्थ सहस्त्रावधि केंद्रें निर्माण केलीं. ५ मनुष्याकरतां तसेंच प्राण्याकरताहि ठिकठिकाणी औषधालये उघडिलीं. ६ प्रवाशांच्या सोईसाठीं रस्त्यावर ठिकठिकाणीं मैलांचे धोंडे, बसवून दुतर्फा छायेचे वृक्ष आणि बागा लावल्या. आणि विहिरी व धर्मशाळा बांधल्या. अपराध्यांना कडक शिक्षा करण्याचें बंद केलें. ८ विहार, स्तूप, स्तंभ, लेण्यांतील देवालयेंही इतकीं बांधलीं कीं, आज त्यांची संख्या ८४ हजारांपर्यंत आहे असें म्हणतात. ९ डोंगरावर, खडकावर, स्तंभावर देवालयांच्या भिंतीवर वगैरे वेळोवेळीं धर्मप्रसारार्थ सूचना खोदविल्या.

अशा रीतीनें अशोकानें आशिया, आफ्रिका, युरोप यासारख्या खंडामध्यें धर्मप्रचार केला. हें त्याच्याच श्रमाचे फळ कीं, भरतखंडांत व इतर खंडांत बौद्धधर्म पसरला एवढेंच नव्हे तर अजून राहिला; ख्रिस्ती धर्मानें आपले बरेच सिद्धांत आणि बायबलमधील अनेक शब्द आणि कथा याच धर्मातून घेतल्या. इंग्लंडमध्येहि ड्रुइड नामक पुरोहितहि कांहींच्या मतें, बौद्धधर्मीय होते. असें असल्यास ख्रिस्ती शकापूर्वीच कैक वर्षें इंग्लंडमध्यें बौद्धधर्माचा प्रसार होऊन राहिला असला पाहिजे. उत्साही बौद्धधर्मप्रचारक भिक्षूंच्या झुंडीच्या झुंडी अमेरिकेंतहि गेल्या असल्या पाहिजेत असें मेक्सिको देशांत बौद्ध अवशेष आणि मूर्ति सांपडल्या आहेत त्यावरुन सिद्ध होतें. अशोकाला रोमचा

बादशाह कॉन्स्टंटाईन याची उपमा देतात तिचें रहस्य हेंच कीं, त्यानें ज्याप्रमाणें ख्रिती धर्माचा अंगिकार करून त्याचा सर्व युरोपभर प्रसार केला त्याप्रमाणें सम्राट् अशोकानेंहि त्याच्याहि पूर्वी चारशें वर्षें बौद्ध धर्माचा प्रचार केला. पण एकप्रकारें अशोकानें कान्स्टंटाईनवरहि ताण केली. कारण आपल्या मुलामुलींना व भावांना भिक्षुक बनवून त्यांच्याकरवीं व स्वतःहि भिक्षु बनून जसा अशोकानें धर्मप्रचार केला तसा आजपर्यंतच्या जगाच्या इतिहासांत कोणीहि केला नाहीं.

३३ अशोकाचे आदेश—अशोकाचे चवदा आदेश प्रसिद्ध असून त्या द्वारांत्यानें १ पशुवधाचा निषेध केला, २ सार्वजनिक आरोग्याची व पशुवैद्यकाची व्यवस्था केली, ३ पंचवार्षिक धार्मिक उत्सव करण्याची आज्ञा केली, ४ धर्माच्या सौंदर्याचें विवेचन केलें, ५ धर्ममहामात्र व उपदेशक नेमिले, ६ प्रजेचें खासगी व सामाजिक वर्तन सुधारण्याकरितां आचारशिक्षक नेमिले, ७ सर्वांना धार्मिक स्वातंत्र्य दिलें, ८ समाजाची दृष्टि पूर्वींच्या हिंसापर कार्यांवरून धार्मिक सुखाकडे वळविली, ९ धार्मिक शिष्य आणि उपदेशक यांची प्रशंसा केली, १० सत्यधर्माचा प्रचार करणाऱ्यांची कीर्ति व शौर्य यांचा महिमा गायिला, ११ दानांमध्यें धार्मिक शिक्षणाचें ज्ञान-दान श्रेष्ठ असें सांगितलें.

३४ अशोकाचे वंशज—अशोकाचा अंत्याविधि झाल्यावर त्याचा मुख्य प्रधान राधागुप्त यानें सर्वांना एकत्र बोलावून सांगितलें कीं, ' महाराजांनीं २०० कोटी सुवर्णमुद्रा दान करण्याचा संकल्प केला होता. त्यापैकीं ९६ कोटि दिल्या असून आपली इच्छा आपल्या युवराजाच्या हातून पुरी होणार नाहीं असें वाटून वृद्धापकाळीं त्यांनीं आपलें सर्व साम्राज्य बौद्धसंघाला दान देऊन टाकिलें. तेव्हां आपण आतां असें करूं कीं, ४ कोट सुवर्ण मुद्रा संघाला देऊन राज्य सोडवून घेऊं.' राधागुप्ताचा हा विचार सर्वांस पसंत पडला. लगेच ४ कोटि मुद्रा भरून राज्य सोडविण्यांत आलें. आणि युवराज संपादि गादीवर बसला. त्याच्यानंतर त्याचा पुत्र बृहस्पति व त्यानंतर अनुक्रमें वृषसेन, सूर्यवर्मा आणि पुष्पमित्र हे राजे झाले. विष्णुपुराणांत लिहिलें आहे कीं, अशोक किंवा सम्पदीच्या पश्चात् मग-



सांचीचें द्वार—मौर्य व आंध्र कला.

धाच्या गादीवर सहा राजे बसले. सुयश, दशरथ, संगत, शालिशुक, सोमशर्मा आणि बृहद्रथ. तदनंतर बृहद्रथाचा सेनापति पुष्यमित्र यानें राजाचा खून करून राज्य बळकाविलें. [ खि. पू. १८४ ]. जरी अशा रीतीनें पुष्यमित्राच्या हातीं राज्य गेलें, तरी मांडलिक या नात्याने मौर्यराजे ८०० वर्षें मगधाच्या एका भागांत राज्य करीत होते. पूर्णवर्मा नांवाच्या मौर्य राजाचें वर्णन ह्युएनसांगनें केलें आहे. अशाच प्रकारें, आठव्या शतकापर्यंत मौर्यवंशाची एक शाखा भारतवर्षांत कोंकणप्रांतासारख्या पश्चिमभागींहि राज्य करीत होती. महाराष्ट्रांतील मोरे हे बहुधा मौर्यच असावेत.

## शुङ्ग वंश ( १८४–७२ खि. पू. )

३५ पुष्यमित्र हाच शुंगवंशाचा संस्थापक. त्याच्या दहा वंशजानीं ११२ वर्षें राज्य केलें. पहिले दोन राजेच काय ते प्रसिद्धीस पावले. इतरांनीं भोगविलासांत चैनीनें दिवस घालविले. प्रांतिक अधिकारी व मांडलिक राजे स्वतंत्र झाले. अखेर कण्ववंशाच्या वसुदेव नामक मंत्र्यानें राजा देवभूतीस ठार करून आपल्या वंशाच्या नांवानें गादी पुढें चालविली.

(२) पुष्यमित्राचें राज्य नर्मदेपासून पंजाबपर्यंत होतें. त्यावेळीं काबूलवर व पंजाबवर युक्रेटाइडस् हा ग्रीक राजा राज्य करीत असे. त्याचा एक आप्त मीनान्दर या प्रसिद्ध सेनापतीनें पुष्यामित्रावर हल्ला करून मथुरा, चितोड आणि अयोध्या हीं शहरें लुटलीं आणि खुद्द पाटलिपुत्रावरच हल्ला करण्याची तयारी केली. परंतु पुष्यामित्राचा नातू वसुमित्र यानें सिंधुनदापर्यंत त्याचा पाठलाग करून तेथें त्यास असें नामोहरम केलें कीं, या वेळेपासून इ. स. १५०२ पर्यंत कोणा युरोपियनाची भारतवर्षावर हल्ला करण्याची छाती झाली नाहीं.

**(३) अश्वमेध आणि पतंजलि ऋषि**—या विजयाच्या स्मरणार्थ पुष्यमित्रानें एक अश्वमेध यज्ञ केला. पण यज्ञास सुरवात होण्याच्या अगोदर पुष्यमित्राची आणि कलिंगाचा जैन राजा खारावेल याची लढाई होऊन त्यांची बरोबरी झाली होती. या लढाईचें कारण पुष्यमित्रानें आरंभलेलें ब्राह्मणमताचें पुनरुज्जीवन. ह्या पुनरुज्जीवनास भगवान् पतंजली

ऋषींच्या उपदेशानें सुरवात झालेली आढळून येते. महाभाष्याचे व योगसूत्रांचे कर्ते पतंजली ऋषि याच पुष्यमित्राच्या काळीं होऊन गेले असावेत.

पुष्यमित्राचा पुत्र अग्निमित्र यानें केवळ आठच वर्षें राज्य केलें. परंतु त्याचा अगर त्याच्या नंतरचाही इतिहास सांपडत नाहीं. केवळ इतकेंच सांगतां येतें कीं त्या वेळीं देशांत सर्वत्र अशांतता माजली होती. कविकुलगुरु कालिदासानें मात्र आपल्या मालविकाग्निमित्र नाटकामध्यें अग्निमित्रास अजरामर करून ठेविलें आहे.

४ कण्ववंशाच्या ब्राह्मण राजांनीं ( वसुदेव, भूमित्र, नारायण आणि सुशर्मा यांनीं ) मगधाची राजधानी पाटलिपुत्र येथें केवळ ४५ वर्षें नांवचें राज्य केलें. मगधराज्याचा एक छोटा इलाखा त्यांच्या ताब्यांत असून इतरत्र गडबड व बेबंदशाहीच माजली होती. अखेर आंध्रपति सीमुक यानें ख्रि. पू. २७ मध्यें तोहि कण्वापासून घेतला व अशा प्रकारें मगधाचें राज्य आंध्राकडे गेलें.

मौर्य सम्राट् बौद्ध होते. यांच्यानंतर भारतीय साम्राज्य दोन ब्राह्मण वंशाकडे गेलें. यांनीं सामाजिक व साहित्यसंबंधींच्या बाबतींत पुराणमताचें उज्जीवन केलें. हल्लींच्या स्वरूपांतील मनुस्मृति याच वेळीं रचण्यांत आली. तसेंच या वेळीं सूत्रांवर भाष्यें लिहिलीं गेलीं, महाभारत व रामायण यांचें संस्करण झालें, नाट्यशास्त्रावर ग्रंथ तयार झाले, कांहीं पुराणें लिहिण्यांत आलीं आणि पतंजलीनें आपले महाग्रंथ निर्माण केले.

---

# प्रकरण ७ वें.

## भारतवर्षाचे ग्रीक राजे.

**१ सेल्युकस व त्याचे वंशज** —शिकंदरच्या मृत्यूनंतर सेल्यूकसच्या ताब्यांत अफगाणिस्थान, इराण आणि आशियामायनरमधील कांहीं प्रांत होते. परंतु त्याच्या मुलाच्या वेळीं खि. पू. २५० मध्यें बलख, (बॅक्टेरिया) आणि पार्थिया हीं राज्यें स्वतंत्र झालीं. त्यावेळीं बलखचें राज्य चांगलें सुधारलेलें असून त्यांत सुमारें एक हजार मोठीं शहरें होतीं. खि. पू. सुमारें १२० पर्यंत तेथें ग्रीकांनीं राज्य केल्यावर त्यांना शक लोकांनीं बलखमधून हांकून लावलें. पुढें इ. स. ५० पर्यंत अनेक छोटे छोटे ग्रीक राजे पंजाबांत व अफगाणिस्थानांत राज्य करीत होते. त्यांचा शेवटचा राजा हरमाओ याचा कुशान जातीचा नायक कैडफाइसिज् या राजानें पराभव केला. अशा रीतीनें पंजाब २५० वर्षं ग्रीकांच्या ताब्यांत राहिला. पंजाबांत कोठें कोठें त्यांचीं नाणीं अजूनही सांपडतात.

या अवधींत राज्य करणाऱ्या ग्रीक राजांत डेमिट्रिअस्, व मिनॅण्डर हे फार प्रसिद्ध आहेत. मिनॅण्डर हा भारतवर्षावर चाल करून आला असतां अग्निमित्र शुंगानें त्यास परतवून चीत केलें. हा ग्रीक राजा काबूलमध्यें राज्य करीत असून तेथें त्यानें बौद्ध धर्माची दीक्षा घेतली. मिलिंद-प्रश्न या पुस्तकानें त्याचें नांव अजरामर झालें आहे.

**२ ग्रीक राज्याचे परिणाम**—वर सांगितलेंच आहे कीं, ग्रीकांनीं पंजाबामध्यें २५० वर्षें राज्य केलें. यावर असा एक प्रश्न उपस्थित होतो कीं, एवढ्या अवधींत भारतवासीय लोक ग्रीक लोकांपासून काय शिकले ? प्रसिद्ध इतिहासकार स्मिथ म्हणतो कीं, भारतवर्षावर ग्रीकांचें तेज जवळ जवळ मुळींच पडलें नाहीं. कारण (१) शिकंदराच्या विजयाचा जो कांहीं थोडा

१ (या प्रकरणांतील तारखा अजून असंदिग्धपणें निश्चित झाल्या नाहींत.)

परिणाम झाला होता, तो चंद्रगुप्तानें लगेच धुळीस मिळविला. (२) यानंतर सेल्यूकसला तर आपला कांहीं प्रांत आणि स्वतःची मुलगीहि चंद्रगुप्ताला अर्पण करावी लागली. तेव्हां त्याच्या स्वारीचा काय प्रभाव पडला असेल हें दिसतेंच आहे! (३) पुढें मिनॅण्डर प्रभृतींनीं जे हल्ले केले त्याचाहि परिणाम झाला नाहीं. कारण त्यांचा सारा वेळ लढण्यांतच गेला आणि शिवाय येथील लोकांनीं त्यांच्यापासून कांहीं शिकण्याची कधींच अपेक्षा केली नाहीं. अपवित्र यवन म्हणून ते त्यांना तुच्छतेनेंच लेखीत असत. (४) पंजाबमध्यें ग्रीक बादशहांचीं नाणींच केवळ राहिलीं. आणि त्यांचा आमच्यावर प्रभाव पडण्याऐवजीं उलट त्यांच्यावरच आमचें असें वर्चस्व झालें कीं, मिनॅण्डरसारखे ग्रीक बादशहा हिंदू किंवा बौद्ध धर्माचे अनुयायी बनले. त्यांनीं येथील भाषा, रीतिरिवाज आणि धर्म उचलले, व भारतीयांनीं त्यांचा पराभव करून त्यांना पचनीं पाडलें. उदा.–भिलसाजवळच्या विसनगरामध्ये माथ्यावर गरुडाची मूर्ति असलेला एक स्तंभ आहे तो खि. पू. १४० मध्यें ग्रीक राजांनीं बांधलेला असून वासुदेवाला अर्पण केला आहे. यावरून भक्तिमार्गाचें पुराणत्व व ग्रीकांचें हिंदीकरण सिद्ध होतें. (५) स्थापत्य, शिल्पकला, व नाट्य वगैरे कलांमध्यें ग्रीक लोकांची भारतवासीयांस थोडीबहुत मदत झाली. ग्रीकांच्या शिल्पकला आणि राज्यसंस्था भारतीयांनीं नापसंत केल्या. ग्रीक पद्धतीचें बांधकाम करण्यास येथे आरंभ झाला होता याला कांहीं पुरावा नाहीं.

खि. पू. १२० च्या सुमारास शक लोकांनीं या ग्रीक राजांचा पराभव करून आपलें राज्य स्थापिलें; त्याचा इतिहास पुढें दिला आहे

## शक राजे. (खि. पू. १२० ते इ. स. ४००)

३ **मूलस्थान**—ऑक्सस् आणि सिरदरिआ या नद्यांमधील प्रदेशांत भटकणारी एक रानटी जात होती. तिचें नांव शक. या लोकांना मध्य आशिआच्या यूची नामक दुसऱ्या एका टोळीनें त्यांच्या देशांतून हाकून लाविलें. तेव्हां ते तेथून निघून बलख देशांत शिरले व तो देश व्यापून बसले. परंतु कांहीं कालानंतर यूची लोकांनीं तेथेंहि त्यांचा पाठलाग केल्यामुळें ते लोक अफगाणिस्थानांत उतरले.

४ राज्यस्थापना—(१) यांच्या एका टोळीनें दक्षिण अफगाणिस्थानांत आपलें राज्य स्थापन केलें आणि त्याला शकस्थान ( सीसतान ) असें नांव दिलें. (२) दुसऱ्या टोळीनें काबूल आणि खैबर ओलांडून तक्षशिला येथें राज्य स्थापिलें. (३) तिसरी एक टोळी पंजाबांतून यमुनेपर्यंत उतरली. हिनें मथुरेमध्यें १०० वर्षें राज्य केलें. व (४) चौथी टोळी हालापर्वत ओलांडून सिंधमधून सौराष्ट्रापर्यंत आली व तेथें दीर्घकाल राज्य करीत राहिली. अखेर जगद्विख्यात विक्रमादित्य राजानें त्यांना तेथून बाहेर काढून लाविलें.

५ उत्तरचे क्षत्रप—मथुरा आणि तक्षशिला येथील राजे उत्तरचे क्षत्रप (शास्ते) या नांवानें प्रसिद्ध आहेत. हे बौद्ध धर्मीय होते. यांच्या राज्याचा बहुतेक इतिहास अज्ञात असून इ. स. च्या दुसऱ्या शतकामध्यें यांना कुशान राजा, दुसरा कैडफाइसिज् यानें जिंकलें.

६ पश्चिमेचे क्षत्रप—सिंध, कच्छ, काठेवाड, गुजराथ, कोंकण, माळवा येथें स्थायिक होऊन राहिलेल्या शकांना पश्चिमेचे क्षत्रप म्हणतात. यांच्यांपैकीं बऱ्याच जणांनीं सनातन धर्माचेंच पालन केलें. याच राजांनीं रुद्ररूपी शिवाची पूजा सुरू केली. सनातनधर्माच्या उद्धारार्थ यांनीं बरेच परिश्रम करून चांगलें धर्मकार्य केलें असें त्यांच्या संस्कृत नांवांवरून दिसून येतें. दक्षिणेच्या आंध्र वंशाशीं यांचें कधीं सख्य, तर कधीं भांडण व लढाई असे संबंध राहिले व शेवटीं आंध्र राजा विलिवायुकुर यानें महाक्षत्रप नाहपान शक यास जिंकून ठार केलें.

७ रुद्रदामन्—हा क्षत्रप नाहपानचा नातू. यानें आंध्र राजा पुलुमायी याला आपली मुलगी दिली होती, तरी त्याच्यावरहि स्वारी करण्यास त्यानें पुढें मागें पाहिलें नाहीं, एवढेंच नव्हे तर इ. स. १४५ मध्यें त्याचा वधहि केला. या विजयशील वीरानें सिन्ध आणि गुजराथ व कोंकण हे भाग आपल्या माळवा देशास जोडून टाकिले. हा वंश २५० वर्षें राज्य करीत असावा. कारण गुप्तवंशभास्कर विक्रमादित्य यानें त्यांना माळव्यांतून हाकललें. रुद्रदामन्चा एक संस्कृत शिलालेख गिरनार-पर्वतावर सांपडला असून त्यावरून असें समजतें कीं, शेतीच्या सोईसाठीं

चंद्रगुप्त आणि अशोक यांनीं बांधलेल्या अनेक कालव्यांची व पाटबंधाऱ्यांची रुद्रदामनानें डागडुजी केली, व सुदर्शन नांवाचा तलाव पुन्हां बांधला.

## कुशान (तुर्क) वंश (इ. स. ४५ ते २५०.)

८ **कुशान वंशाचा आरंभ**—शक लोकांना त्यांच्या देशांतून हांकून लावून तो देश एका यूची टोळीनें आक्रमिल्याचें वर सांगितलेंच आहे. या यूची टोळीला दुसरी एक सव्वा शेर टोळी भेटून या दुसऱ्या टोळीनें त्यांना त्यांच्या नव्या घरांतून हाकून लाविलें. तेथून त्यांनीं शकांपासून बलख देश जिंकून घेतला आणि तेथें १०० वर्षें शांततेनें राज्य केलें. बलखासारख्या सुधारलेल्या देशांत गेल्यानें हे लोकहि तेथें सुधारले. या टोळींतच कुशान नामक एक पोटजात असून तिचा नायक कैडफायसिज् हा इतर सर्व पोटजातींचा सरदार बनला; तेव्हां यूची हें जुनें नांव जाऊन सगळ्याच लोकांना कुशान असें नांव पडलें. यांना देवपुत्र असेंहि दुसरें नांव आहे. या कैडफाइसिजनें इराणचा कांहीं भाग, काबूल आणि काश्मीर जिंकले व आपल्या राज्यास चांगली बळकटी आणिली. नंतर वयाच्या ८० व्या वर्षीं तो निवर्तला.

९ **दुसरा कैडफाइसिज्**:-- हा इ. स. ७८ सालीं सिंहासनावर बसला. आपल्या राज्यारोहणाच्या वर्षापासून त्यानें एक शक सुरू केला. कांहींच्या मतें, तोच आज शालिवाहन शक या नांवानें प्रसिद्ध आहे. परंतु हा शक शालिवाहनकुलांतील पुलुमायी राजानें सुरू केला, असे कांहींचें म्हणणे आहे. हा आपल्या बापाला सर्वस्वी शोभण्यासारखा मुलगा होता. हा मोठा उत्साही आणि विजिगीपु असून याने चीनच्या राजपुत्रीशीं विवाह करण्याचें ठरवून राजाकडे मुलीच्या मागणीकरितां दूत पाठविले. चिनी राजानें दूतांचा अपमान करून त्यांना परत पाठविले. तेव्हां रागानें सत्तर हजार सैनिक घेऊन त्यानें चीन देशावर चाल केली; पण शेवटीं हार खाऊन बिचाऱ्यास चीन देशाचें आधिपत्य मान्य करावें लागलें. नंतर भारतवर्षात विजय मिळविणें त्या मानानें सोपें असल्यानें पंजाबांतील ग्रीक आणि शक राजांना एकटें एकटें गांठून जिंकण्याचा त्यानें आरंभ केला. आणि इ. स. १००

चे सुमारास काशीपर्यंतचें बहुतेक उत्तर भारतवर्ष त्यानें आपल्या सत्तेखालीं आणलें. पण असें असलें तरी एका दृष्टीनें या विजयी वीरावरहि भारतवर्षीयांनीं विजय मिळविला असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, त्यांनीं त्याला शिवभक्त बनविलें व आपल्या धर्माचा अनुयायी केलें. इ. स. ९९ मध्यें यानें रोमचा बादशहा ट्रोजन याच्या दरबारीं आपले वकील पाठविले.

१० कानिष्क:—हा सुमारें इ. स. १२० मध्यें राज्यावर बसला. (१) कनिष्क हा एक महापराक्रमी, शक्तिमान् व राजनीतिकुशल असा राजा असून त्याचें नांव चीन, तिबेट, मंगोलिया इत्यादि अनेक देशांच्या शेंकडों गोष्टींत प्रसिद्ध होऊन राहिले आहे. देशदेशांतरीं बौद्धधर्माचा प्रचार केल्यामुळे व प्रत्यक्ष बुद्धाप्रमाणें घरोघरीं सन्मान पावल्यामुळें हा राजा एक प्रति अशोकच होता, असें म्हटलें तरी चालेल. परंतु याचा बौद्धधर्म भगवान् बुद्धानें उपदेशिलेला सनातन बौद्धधर्म नसून महायान नामक त्याचें एक नवीन भक्तिप्रधान रूपांतर होतें. या पंथाचीं तत्त्वें इ. स. १४० मध्यें एका सभेत निश्चित केलीं गेलीं. (२) कनिष्कानें भारतवर्षाचा यमुना व चंबळ नद्यांपर्यंतचा सर्व भाग पादाक्रांत केला, व आपल्या राज्याची सीमा सिंध, काश्मीर व आजचें अफगाणिस्थान व बलुचिस्थान यांच्या पलीकडे नेऊन भिडविली. ( नकाशा पहा. ) (३) कनिष्काच्या पूर्वीच्या राजानें चीनकडून मार खाल्ला होता, तरी कनिष्कानें चीनपासून काशगर, यारकंद व खोतान हे प्रांत जिंकून घेतले आणि चीनचा युवराज कनिष्काच्या दरबारांत ओलीस येऊन राहिला. अशा प्रकारें यावेळीं भारतीय साम्राज्याचा मोठा विस्तार होऊन त्याबरोबरच भारतीय संस्कृतीचाहि झपाट्यानें प्रसार झाला. ( ४ ) पण या विजयांनींहि कनिष्काचें समाधान झालें नाहीं. उत्तरेकडे आणखी विजय मिळविण्याची त्याची इच्छा होती. परंतु त्याची प्रजा व सेना एकसारख्या युद्धामुळें चिडून गेली होती, आणि त्यांनीं वेळ साधून आपल्या राजाचा खून केला. (५) कनिष्काचेवेळीं कलाकौशल्य ऊर्जितावस्थेंत येऊन विद्येचा विशेष प्रसार झाला.

११ हुविष्क—यानें कनिष्कानंतर इ. स. १६२ ते १८२ पर्यंत २० वर्षें राज्य केलें. याच्या नाण्यांवर ग्रीक, इराणी व भारतीय देव-

तांचीं चित्रें सांपडतात. यानें काश्मीरमध्यें बारामुला घाटांत हाविष्कपूर नगर वसविलें. याच्या बापाइतकें याचें बौद्ध धर्मावर प्रेम नसल्यानें तो वैदिक धर्मानुयायी झाला होता. याच्या राज्यासंबंधीं विशेष माहिती मिळत नाहीं, तरी यानें आपल्या बापाच्या विस्तृत राज्याचें चांगलें संरक्षण केलें असें दिसतें.

१२ वासुदेव—इ. स. १८२–२२०. याच्या नांवावरून असें समजून येतें कीं, याच्या पासूनचे पुढील कुशान राजे सर्वस्वी हिंदू झाले. याच्या नाण्यांवर शिवाचीं व नंदीचीं चित्रें सांपडतात, यावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होते. याची सारी कारकीर्द धामधुमींत गेली, आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, या वेळीं दक्षिणेंत आंध्रांचें राज्य आणि इराणांत पार्थियनांचें राज्य नष्ट होऊन त्याच वेळीं कुशानांचेंहि राज्य विलयाला गेलें. या तीन दुर्दैवी त्रिविघटनांचा एकमेकींशीं कितपत संबंध होता हें साधनाभावीं आज सांगतां येत नाहीं. यानंतर काबूलमध्यें कुशानांचीं कांहीं लहान लहान राज्यें होतीं. त्यांचा हूण लोकांनीं पाडाव केला.

१३ अराजकतेचें शतक—कुशान राज्य विलयास गेल्यानंतर शंभर वर्षें, बलाढ्य सत्तेच्या अभावीं देशभर अनेक छोटे छोटे राजे राज्य करीत होते, व त्यांची यादवी व भांडणें एकसारखीं चालू होतीं. सर्व देशभर अशान्ततेचें व अराजकतेचें साम्राज्य पसरलें होतें. वायव्येची सरहद्द उघडी पडली होती. मगध देशांत खि. पू. २७ मध्यें आंध्रांच्या राज्याचा शेवट झाला. यानंतर आंध्र वंशांतीलच कांहीं राजपुत्र तेथें राज्य करीत असावेत, पण तेथेंहि सर्वसाधारणपणें बंडाळीच माजून राहिली होती. परंतु सुदैवानें या सर्वांचा शेवट गोड होणार होता. मगधांच्या पूर्वीच्या शक्तिमान् राज्याप्रमाणेंच बलाढ्य व वैभवशाली असें एक नवीन गुप्तवंशाचें राज्य स्थापन होणार होतें.

## १४ या कालची भारतीय संस्कृति

१ विदेशीयांचें हिंदीकरण— वरील वृत्तांतावरून दिसून येतें कीं, धर्मदृष्ट्या आणि राजकीय दृष्ट्याहि कुशान लोक पूर्ण भारतीय आर्य बनले होते आणि यामुळें एका जित राष्ट्राचे बेजबाबदार



जावा बेटांतील बोरोबुदूरचे देवालय.

(पृष्ठ ३०)



बोरोबुदूरच्या देवालयांतील खोदकाम.



बोरोबुदूरच्या देवालयाचे महाद्वार.

(पृष्ठ ७३.)

व जुलुमी राजे या नात्यानें त्यांना येथें वागणें अशक्य झालें.' तत्कालीन भारतीय संस्कृति इतकी विशाल व सर्वव्यापक होती कीं, तिनें आपल्या तुर्की जेत्यांना आपल्या धर्मात घेऊन त्यांच्यावरहि एक प्रकारें विजय मिळविला, व नंतर त्यांचा विदेशी अंश आपण पचवून टाकून त्यांचेंच स्वदेशीकरण केलें.

२ आशियाशीं संबंध—या दीर्घ रियासतींत आर्यसंस्कृतीचा मध्य व पश्चिम आशियाभर आणि जलमार्गावरील व्यापाराच्या विस्तारामुळें भारतवर्षाचा बर्मा, सयाम, जावा, कँबोडिया इत्यादि परदेशाशीं निकट संबंध आला. तेथें भारतीय वसाहती होण्यास सुरवात झाली, आणि वैदिक धर्म व बौद्धधर्म या दूर देशांपर्यंत पोहोंचून तेथें दृढमूल झाले. बोरोबुदूर, अंगकोर, कंबोडिआ, परंबानम् इत्यादि ठिकाणीं या वेळीं बांधलेलीं अनेक अजरामर स्मारकें आज दृष्टीस पडतात. प्रथम वैदिकधर्म व नंतर बौद्धधर्म तेथें वर्चस्वी झाला.

३ युरोपशीं संबंध—कुशानांच्या कारकीर्दींत रोमचे आणि भारतवर्षाचे संबध अधिक दृढ झाले, व यामुळें भारतीय संस्कृति व भारतीय कलाकौशल्य रोममध्ये शिरले. याच वेळीं रोमन लोकांना वाघ, हत्ती वगैरेंचें प्रथम दर्शन घडलें. ऑगस्टस् बादशहा आणि अथेन्सचे लोक यांच्या समक्ष एका हिंदी फकिरानें आपखुषीनें अग्निप्रवेश केला. हिंदुस्थानांतील भरजरीचें कापड, रेशमी कापड, मलमल वगैरेवर रोमच्या बाजारांत लोकांच्या उड्या पडत असून, ते त्याकरितां कितीहि भारी किंमत देत. आयात-निर्यातीचा वार्षिक हिशेब भागवितांना भारतवर्षाची रोमकडे सुमारें दीड कोटी रुपये बाकी निघत असे. पौर्वात्य चालीरीति रोमच्या सामाजिक जविनांत क्रांति घडवूं लागल्या. ग्रीस व गांधार शिल्पपद्धतींचा परस्परांवर परिणाम होऊं लागला व भारतीय कायदा, वैद्यक आणि शिल्प यांनीं रोम व ग्रीस काबीज करण्यास प्रारंभ केला.

४ बौद्धिक प्रगति—कुशान बादशहांनीं तक्षशिला विश्वविद्यालयास मोठमोठ्या उदार देणग्या दिल्यामुळें, त्या वेळीं तें महायान पंथाचें एक एवढें मोठें केंद्र बनलें कीं, तेथें अखिल आशियाखंडांतील विद्यार्थी ज्ञानार्जना-

करितां जमत. कनिष्काचे वेळीं विद्या व कलाकौशल्य यांची चांगलीच उन्नति झाली होती. विद्वान् बौद्ध भिक्षु नागार्जुन, अश्वघोष, वसुमित्र, वैद्यराज चरक हे याच वेळीं होऊन गेले. तसेंच भारतीय धर्मप्रचारक भारतवर्षाच्या धर्माचा संदेश चीन, तार्तरी, तिबेट, जपान इत्यादि देशांस पोहोंचवत.

कनिष्काने दोन भव्य इमारती बांधल्या. [ १ ] एक टोलेजंग तेरा मजली स्तूप. हा चारशे फूट उंच असून अगदीं अद्भुतच होता. [ २ ] एक उत्कृष्ट मठ. हा पुरुषपुर अगर पेशावर येथें असून आजमितीस त्याचे अवशेष तेथें सांपडतात.

१५ अस्तोदय—मौर्यांच्या अस्तापासून गुप्तांच्या उदयापर्यंत भारतीय इतिहासांतील मुख्य मुख्य घडामोडी.

( १ ) मौर्यांचें साम्राज्य नष्ट झाल्यावर देशांत अनेक छोटे छोटे राजे राज्य करूं लागले. शुंग आणि कण्ववंशीय राजे मगध येथे आणि उत्तर भारतवर्षांतील कांहीं भागांवर राज्य करीत होते.

( २ ) त्या वेळीं ग्रीक राजमंडळ अफगाणिस्थान आणि पंजाब यांमध्यें आपल्या राज्याचा विस्तार करूं लागले होते. मिनॅण्डर तर काशीपर्यंत चाल करून आला. परंतु त्यास पराभव पावून बौद्धधर्माचा स्वीकार करावा लागला.

( ३ ) दक्षिणेंत आंध्रांनीं कण्ववंशाचा नाश करून मगधाचें राज्य प्राप्त केले. हा वंश इ. स. २२० पर्यंत प्रबळ होता. पश्चिमेच्या क्षत्रपांनीं याचें राज्य हस्तगत केले.

( ४ ) या सुमारास भारतवर्षावर शक आणि कुशान लोकांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या. उत्तरेंत त्यांची सत्ता मथुरेपर्यंत पसरली, आणि दक्षिण किनाऱ्यावरहि इ. स. ४००पर्यंत क्षत्रपांचेंच राज्य राहिलें. शेवटीं विक्रमगुप्तानें त्याचा नाश केला.

( ५ ) कुशान लोकहि इ. स. ३५० पर्यंत राज्य करीत होते. उत्कर्षकालीं, त्यांचा राज्यविस्तार काबूल–काश्मीरपासून काशीपर्यंत होता. पण येथील हिंदूंनीं त्यांचें हिंदीकरण केलें.



अंगकोर देवालय—कंबोडिआ.

( ६ ) या लोकांत कनिष्क नांवाचा एक सम्राट् होऊन गेला. तो प्रति अशोकच होता. त्यानें चीनादि देशांत महायान बौद्धधर्माचा प्रसार केला, आणि मध्यआशिआचा बहुतेक प्रान्त भारतवर्षाच्या साम्राज्यास जोडिला.

( ७ ) बौद्धमताचा चांगला प्रसार झाला. राजाश्रय मिळाल्यानें व नवीन लोकांनीं बौद्धधर्माचा स्वीकार केल्यामुळें हजारों 'भवनें' व 'विहार' निघाले. हिंदुधर्माचा ऱ्हास झाला. परंतु चतुर ब्राह्मणांनीं जेव्हां बौद्धमताचें स्वरूप बदललें, तेव्हां बौद्धतत्त्वांचा आपल्या सनातनधर्मांत समावेश करून घेऊन त्यांनीं आपला धर्म लोकप्रिय केला. शेवटीं गुप्तकालामध्यें बौद्धधर्माचा येथें लोप झाल्यावर हिंदुधर्म बलवत्तर झाला.

(८) या कालीं काबूल, इराण, मध्यआशिआ, चीन इत्यादि देशांच्या भाषेत भारतीय साहित्याचा अनुवाद होऊं लागला.

(९) वरील देशांशीं जडलेले आमचे व्यापारी संबंध अधिक दृढ झाले.

१६ बौद्ध इमारती—बौद्धमताभिमानी अनेक दानशूर गृहस्थांनीं भारतवर्षांतील प्रत्येक प्रांतांत अगदीं पेशावर, काश्मीरपासून तों थेट कन्याकुमारीपर्यंत ख्रि पू. ४०० शेंपासून एक हजार वर्षांत विविध प्रकारच्या हजारों इमारती उभारल्या. आज दोन हजार वर्षांनंतरहि त्यांपैकीं शेंकडों इमारती शाबूद आहेत. यांतील चित्रकलेचें व शिल्पकलेचें काम तर केवळ अनुपम असून परदेशांतहि इतक्या उच्च दर्जाचीं कामें फारशीं नाहींत. नाणावलेल्या युरोपियन चित्रकारांना सुद्धां स्तिमित करणारी कला, एके वेळीं आमच्यात असून आज ती सर्वथैव लुप्त व्हावी, ही दुर्दैवाची गोष्ट होय.

बौद्ध इमारतींचे प्रकार (कंसांत प्रसिद्ध प्रसिद्ध स्थळें दिलीं आहेत.)

१ स्तंभ—यांवर बौद्धधर्माचे नियम व सिद्धान्त खोदले आहेत. माथ्यांवर वाघांच्या व हत्तींच्या मूर्ति आहेत. [ प्रयाग, दिल्ली, लारीय, नंदनगड, सांची. ]

२ स्तूप—यांच्याखालीं भगवान् बुद्धाच्या दग्धशरीराचे अवशेष असतात. हे अर्धगोलाकृति स्तूप बौद्ध इमारतींचीं विशेष चिन्हें होत. [ भिलसा, सांची, शारनाथ, अमरावती. ]

३ कठडे—स्तूपांच्या चारी बाजूस नक्षीदार दगडी कठड्यांचें कांपौंड असतें. सांची व भीरुत या ठिकाणच्या कठड्यांचें काम पूर्ण स्वदेशी असून त्यावर विदेशी कलेची थोडीहि छटा नाहीं. [ भीरुत, सांची आणि अमरावती. ]

४ चैत्य—लेण्यांमधील देवालयें. ( राजगृह, गया, नाशिक, कार्ले, एलोरा, अजण्ठा, कण्हेरी, पावला, [ कोल्हापूर. ] )

५ विहार—बौद्ध भिक्षूंचे राहण्याचे आश्रम. ( पेशावर, तक्षशिला, नाशिक, एलोरा, अजंठा, नालंदा. )

---

## प्रकरण ८ वें.



### गुप्त वंश ( इ. स. ३२० ते ६००. )

१ भारतवर्षाचें सुवर्णयुग-गुप्तांच्या पूर्वीं हिंदुस्थानांत लहान लहान अशीं निरानिराळीं पुष्कळ राज्यें होतीं. त्यांच्या आपसांत वारंवार लढाया होत. प्रजा विदेशी राजाच्या जुलुमाला कंटाळली होती. त्या काळची अधिकृत ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाहीं. परंतु गुप्तांच्या उदयामुळें ही स्थिति पालटली. लहान लहान राज्यें मोडून सर्व देशाचें संघटन झालें. एकछत्री राज्य सुरू होऊन निश्चित राज्यव्यवस्था प्रस्थापित झाली. त्यामुळें जिकडे तिकडे ज्ञानवृद्धि व सुखवृद्धि होऊन लोकांत जागृति झाली. संस्कृत विद्येचा पुष्कळच प्रसार झाला. राजदरबारीं पंडितांना मान मिळूं लागला. व्यापाराची भरभराट झाली, विविध व्यवसाय व धंदे ऊर्जितावस्थेस आले. आणि देश विदेशी स्वाऱ्यांपासून सुरक्षित राहिला. या कारणांमुळें गुप्तकालाला भारतवर्षाचें सुवर्णयुग किंवा भारतवर्षाचा पुनरुज्जीवनकाल असें म्हणतात.

२ गुप्त व मौर्य—बौद्ध कालामध्यें ज्याप्रमाणें मौर्यवंश उत्तम राज्यव्यवस्था, धर्मप्रसार व दिग्विजय यांच्या योगानें प्रसिद्ध झाला होता, त्याच-



कार्ले येथील लेणी—इ. स. च्या आरंभकालीन.

[ हिंदुस्थानांतील अति भव्य लेण्यांपैकीं हें एक आहे. क्षेत्रफळ १२४×४५'×४५' ]



कार्लीचा चैत्य.



सांची स्तूप.




**महेशरूपांत शिवाची मूर्ति**–एलिफटा लेणी.

( हिंदुस्थानातील सर्व लेण्यात हे उत्कृष्ठ उठावाचे काम आहे. )

हे चित्र मुंबई जवळ समुद्रातील एका खडकात खोदिले आहे. त्रिमूर्तिची उंचि १८ फू., रुंदी २० फू. व खोली १३ फू. असून मधल्या मूर्तिचे तोंड ५ फू. लांब आहे. शेजारी उभ्या असलेल्या मूर्ति सुमारे १८ फू. उंच आहेत.

प्रमाणें नंतरच्या हिंदु-धर्माच्या पुनरुज्जीवनकालामध्यें गुप्त वंश वरील गुणामुळेंच प्रसिद्धीस आला. अशोकानें बौद्धधर्माची दीक्षा घेऊन त्याचा आपल्या साम्राज्यभर प्रचार व प्रसार केला, तर गुप्तवंशांतील दुसऱ्या विक्रमादित्यानें पुराणोक्त धर्माचा उत्साहपूर्वक पुरस्कार केला. त्याच्या नाण्यांवर प्रायः लक्ष्मीची मूर्ति आहे. बौद्ध चिन्हें असलेलीं गुप्तांचीं नाणीं फार थोडीं सांपडतात.

३ चंद्रगुप्त—( इ. स. ३२०-३३० ) लछवी लोकांचा अजातशत्रूच्या वेळेपासून पुढील आठशें वर्षांचा इतिहास नीटसा सांपडत नाहीं. तरी एकंदरींत या लोकांमध्यें जागृति कायम राहिली होती, व चौथ्या शतकांत यांचें पाटलिपुत्रावर सुद्धां राज्य चालत होतें. यांच्यापैकीं एक राजकन्या कुमारदेवी ही मगध देशांतील चन्द्रगुप्त नामक राजाला दिली होती. या विवाहानें दोन घराणीं एकत्र झाल्यामुळें चंद्रगुप्ताचें बल वाढलें. त्यानें आपल्या राज्याचा विस्तार पाटलिपुत्र, बिहार, अयोध्या, प्रयाग, आणि तिरहूत या प्रांतांपर्यंत वाढविला, आणि आपल्या, आपल्या राणीच्या व लछवी लोकांच्या जोडनावानें नाणीं पाडलीं.

गुप्तसंवत्—इ. स. ३२० मध्यें चंद्रगुप्तानें आपणास राज्याभिषेक करविला. या वर्षांपासून गुप्त सवत्-सुरू झाला.

४ समुद्रगुप्त—( ३३० ते ३७५ ) चंद्रगुप्ताचा पुत्र. हा गुप्तवंशांत एक अत्यंत बलाढ्य राजा होऊन गेला. इतिहासकारांनीं याचें नांव 'भारतीय नेपोलियन' असें ठेविलें आहे. पण नेपोलिअनचा झाला त्याप्रमाणें याचा पराभव अगर दुःखद अंत न झाल्यामुळें, एका दृष्टीनें हा राजा नेपोलियन पेक्षांहि मोठा होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. यावरून याच्या प्रतापाची कल्पना येईल.

**साम्राज्यविस्तार**—अशोकानंतर समुद्रगुप्तानें जवळजवळ अखिल भारतवर्षाचें एकछत्री साम्राज्य स्थापिलें. राजपुताना व बुंदेलखंड वगैरे ठिकाणच्या रानटी टोळ्यांना आपल्या सत्तेखालीं आणिलें; दक्षिणेंतील पल्लव, राष्ट्रकूट, कालिंग, कोसल, महाराष्ट्रीय वगैरे कावेरीपर्यंतच्या सर्व लोकांना जिंकून टाकिलें. नेपाळ, कामरूप ( आसाम ) आणि बंगाल

हे देशही त्याच्या ताब्यांत होते. काबूल, गांधार आणि लंका या देशाच्या राजांनीं त्याचा स्नेह संपादन केला होता. तीन हजार मैलांची प्रचंड ' विजय-यात्रा ' ( सोबतचा नकाशा पहा. ) संपल्यानंतर, त्यानें अश्वमेध यज्ञ केला. समुद्रगुप्तानें स्वतःच एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें हा यज्ञ चिरकाल लुप्त झाला होता. अर्थातच हिंदुधर्महि सुप्तावस्थेंतच होता, व हा अश्वमेध यज्ञ हिंदुधर्माच्या जागृतीचें व नवचैतन्याचें मुख्य चिन्ह होतें. या विजयाचा वृत्तांत हरिसेन नामक कवीनें प्रयागांत उभारलेल्या स्तंभावर संस्कृत भाषेंत खोदला आहे. हा स्तंभ अद्यापहि उभा आहे. लखनौमधील एका दगडी घोड्यावरहि अशा प्रकारचा वृत्तांत सांपडतो.

**हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन**—एकंदरींत, १ नाण्यांवर पौराणिक देवदूतांच्या मूर्ति घालणें, २ अश्वमेध यज्ञ करणें, ३ संस्कृत भाषेचा पुरस्कार करणें, ४ हिंदु संस्कृतीचें केन्द्र म्हणून आजहि प्रसिद्ध असलेल्या अयोध्येला आपली राजधानी नेणें, इत्यादि गोष्टींनीं समुद्रगुप्तानें हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनास फार मोठें सहाय केलें.

समुद्रगुप्त वरीलप्रमाणें शूर, योद्धा व चाणाक्ष सेनापति असून सुद्धां तो एक उत्तम विद्वान् कवि व गानविद्यानिपुण असा होता.

**५ दुसरा चन्द्रगुप्त ( विक्रमादित्य )—( इ. स. ३७५ ते ४१३ )** काव्येतिहासांत वर्णिलेल्या हजारों हिंदू गोष्टींनीं सुप्रसिद्ध झालेला राजा हाच विक्रमादित्य ( पराक्रमाचा सूर्य ) होय. याच्या पित्यानें शक क्षत्रपांना आपल्या सत्तेखालीं आणलें होतें. तरी यानें त्यांच्याशीं अव्याहतपणें १२ वर्षें लढून त्यांना जमीनदोस्त करून टाकिलें. यामुळें माळवा, गुजराथ आणि सौराष्ट्र किंवा काठेवाड हे देश त्याच्या ताब्यांत आले. अशा प्रकारें त्याचा राज्यविस्तार पश्चिमेकडे समुद्रापर्यंत होत गेल्यामुळें, बाहेरच्या इतर देशांशीं त्याचा समुद्रद्वारें संबंध आला, आणि शिवाय सुसंपन्न व सुपीक असे अनेक देशहि त्याला प्राप्त झाले. यामुळें सर्व गुप्त राजांमध्यें तोच सत्ता व संपत्ति यांच्या शिखरावर पोहोंचला होता. शकाबरोबर युद्ध करून त्यांना जिंकल्यामुळें, त्याला ' शकारि ' हें उपपद प्राप्त झालें. चंद्रगुप्तानें एकंदर ३८ वर्षें राज्य केलें.


सन ३२० ते भारत - ६४७ पर्यंत
गुप्त व हर्षाची साम्राज्यें
तिबेट
बंगालचा उपसागर
हिंदी महासागर

विद्येला उत्तेजनः—विक्रमाच्या दरबारीं विद्वान् मंडळींना आश्रय असून त्यांतलि खालील नवरत्नें विशेष प्रसिद्ध आहेतः—कालिदास, शंकु, धन्वंतरि, क्षपणक, अमरसिंह, वेतालभट्ट, घटकर्पर, विराह-मिहिर व वररुचि. या सर्वांत अग्रपूजेचा मान कविकुलगुरु कालिदास याचा असून हा महाकवि आपल्या काव्यांनीं व नाटकांनीं भारत-खंडांतच काय पण अखिल जगांत विख्यात व पूज्य होऊन राहिला आहे. या भारतीय शेक्सपिअरचें शाकुंतल नाटक वाचून सुप्रसिद्ध जर्मन कविसम्राट् गटे हा हर्षातिशयानें नाचूं लागला असें म्हणतात. उपमाचातुर्य, ध्वनिसौंदर्य, मधुरता, मनोरमता, प्रसाद, कोमलता इत्यादि गुणांनीं याच्या काव्यानें जगाच्या वाङ्मयांत उच्चस्थान पटकाविलें आहे. तत्कालीन इतर पंडितांनींही निरनिराळ्या शास्त्रांत उच्चस्थान मिळविलें होतें, यामुळें त्याच्या कारकीर्दींत साहित्य, वैद्यक, ज्योतिष, गायन, गणित, व्याकरण, वगैरे शास्त्रांची फारच झपाट्यानें प्रगति झाली.

६ कुमार गुप्त ( इ. स. ४१३ ते ४५३ ) याच्या कारकीर्दीची एवढीच माहिती उपलब्ध आहे कीं, यानें ४२ वर्षें मोठ्या कुशलतेनें व न्यायानें राज्य केलें, कांहीं नवीन मुलूखहि संपादिला, आणि मोठ्या समारंभानें एक अश्वमेध यज्ञ केला.

७ स्कंदगुप्त ( ४५५ ते ४८० ) व श्वेत हूण लोक–स्कंधगुप्तानें राज्यारोहण केलें असेल नसेल तोंच क्रूर व भयंकर हूण लोकांनीं याच्या राज्यावर चाल केली. परंतु यानें मोठ्या शौर्यानें त्या सर्वांचा पराभव केला, आणि क्रूर हूणांच्या अत्याचारांपासून भारतवर्षाचें रक्षण केलें. या काळचीं सुमारें तेरा वर्षें मोठ्या शांततेंत गेली. याची राजधानी अयोध्या नगरी होती. यानें ब्राह्मणांना आणि बौद्धांना चांगल्या रीतीनें वागविलें. तसाच जुनागड येथील तलाव दुरुस्त केला. अशा प्रकारें हा शांततेनें राज्य करीत असतांना इ. स. ४७० मध्यें हूणांनीं याच्यावर पुनः स्वारी केली, त्यांत याला हार खावी लागली. या वेळीं हूणांनीं येथें अनन्वित अत्याचार केले, आणि ते आपले पाय हळू हळू पसरूं लागले. त्यांनीं पंजाबादि भागांतलि अनेक मठ व मंदिरें जमीनदोस्त केलीं. हजारों लोकांचा

अमानुषपणें वध केला, आणि जिकडे तिकडे लुटालूट, जाळपोळ करून धुमाकूळ घातला. पण शेवटीं समाधानाची व अभिमानाची गोष्ट ही कीं, चीन, तुर्कस्थान, इराण, टर्की, जर्मनी व रोमन साम्राज्य या सर्वांची धूळ-धाण करून टाकणाऱ्या या हूणांनाही भारतवर्षांतून मार खाऊन सैरा-वैरा पळ काढावा लागला. वायव्येकडील कांहीं भाग मात्र त्यांच्या ताब्यांत राहिला.

८ गुप्त वंशांतील शेवटचे राजे ( इ. स. ४८० ते ६०० )—

पराक्रमी स्कंदगुप्त इ. स. ४८० मध्यें वारला. त्याच्यानंतर पुरुगुप्तानें हूणांशीं पांच वर्षें सतत युद्ध करून त्यांना मागें हटविलें. याच्या पश्चात् नरसिंहगुप्त बालादित्यानेंहि मोठ्या शौर्यानें हूणांना थोपवून धरलें, पण अखेर तोरमान हूणानें पंजाब व माळवा येथे आपले पाय रोंवलेच. इकडे, गुप्तांची दुर्बलता पाहून त्यांचे प्रांतिक अधिकारी स्वतंत्र झाले, आणि कालान्तरानें गुप्तसाम्राज्यहि नाश पावलें. फक्त या वंशाची एक शाखा इ. स. ९०० पर्यंत मगध देशात व दुसरी इ. स. ५०० पर्यंत माळवा प्रांतीं राज्य करीत राहिली.

९ फाहीन—हा प्रसिद्ध चिनी प्रवासी इ. स. ४०० मध्यें बौद्ध धर्माच्या स्थितीचें अवलोकन करण्यास आला असून त्यानें बारा वर्षें येथें प्रवासांत घालविलीं. त्यानें लिहून ठेवलेला तात्कालीन वृत्तांत प्रत्येक भारत-वासीयानें अभिमानानें वाचण्यासारखा आहेः—

( अ ) राज्यव्यवस्था—मथुरेमधील प्रजा अत्यंत सुस्थितींत असून फार सुखी आहे. त्यांना कसलेहि कर द्यावे लागत नाहींत, कीं राजा-पासून कसलाहि त्रास पोंहचत नाहीं. फक्त राज्यांतील जमीन पिकविणा-ऱ्यांना तिच्या उत्पन्नांपैकीं कांहीं ठराविक हिस्सा सरकारांत भरावा लागतो. त्यांना कोठेंहि जाण्यास आणि राहण्यास पूर्ण मुभा आहे. तेथें शारीरिक शिक्षा कधींहि देत नाहींत. फक्त अपराध्यांच्या स्थित्यनुसार कमी अधिक दंड करितात, आणि कोणी राजद्रोह केला तरी केवळ त्याचा उजवा हात तोडून टाकतात.

# अजिंठा येथील चित्रकला.

**मृत्युशय्येवर पडलेली राजस्त्री:**— कोणी राजा, राज्य आपल्या स्त्रीवर सोपवून बुद्धभिक्षु जाहला. त्याची राणी विरहानें खंगून खंगून मरणाच्या पंथांत आहे. मरणसमयीं पतीचें दर्शन नाहींतर निदान त्याच्या राजमुकुटाचें तरी दर्शन घ्यावे या हेतूनें दोन सेवकांकडून राजमुकुट आणविला आहे, पण त्याकडे पहाण्यास पापणी उघडण्याचें देखील तिच्यांत सामर्थ्य राहिलेलें नाहीं. हें एकंदर चित्र अत्यंत भावनापूर्ण आहे व त्यांतील स्त्रीवैद्य व इराणी नोकर हे पहाण्यासारखे आहेत.



**पितृमातृपोशिकाजातक:**—एक शुभ्र हत्ती कमलाच्या तळ्यांत पकडला गेला. तेथून त्याला राजाच्या पागेत आणून फुलांच्या माळांनीं सुशोभित केलें. राजानें त्याला उत्तम प्रकारचें अन्न दिलें. पण तो हत्तिरूप बोधिसत्व घांसभरही खाईना तो म्हणाला, माझ्या आईबापास सोडून मी कांहींसुद्धां खाणार नाहीं. ही हकिकत राजानें ऐकल्यावर त्याला सोडून दिलें. त्यानंतर तो जंगलांत आपले आईबाप व जातभाई यांस जाऊन भेटतो.



**वज्रपाणी बुद्ध :**— हा वज्रपाणी सुवर्णदेही काढला आहे.



या चित्रांत हाताला आधार ह्मणून दोघां गृहस्थानीं खाद्या वर चामड्याचे पट्टे घातले आहेत. त्याला बकलें काढलीं आहेत. तीं अगदीं अलीकडील बकलांप्रमाणें आहेत. बकलामध्यें पंधराशें सतराशें वर्षांतही आजतागायत बदल झाला नाहीं, असें ह्मणणें प्राप्त आहे. एकंदरीत हें चित्र फार सुंदर आणि काळजीपूर्वक काढलें आहे.

**नाग व आर्यराजांचें संभाषण:**— यांतील प्रत्येक मनुष्य प्रमाणबद्ध रेखाटलेला असून रंग साधे व आल्हाददायक दिसतात. या ठिकाणी संभाषण व तें उत्सुकतेनें ऐकणें, चालले आहे, हा प्रकार काढला आहे, तर दुसरीकडे निराळीच मौज चालली आहे. एकंदरीत या एकाच चित्रात पाच महा प्रकारचे



मनोविकार अत्यंत कुशलतेनें दाखविले आहेत. एकंदर चित्र फार सुंदर आणि रमणीय आहे. त्या वेळच्या उत्तम चित्रकलेचा हा नमुना आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं.

( आ ) आचार—' चांडाल लोकांशिवाय सर्व देशांत एकहि मनुष्य कांदा लसूण खात नाहीं. कोणीहि दारू पीत नाहीं, कीं हत्या करीत नाहीं. गांवांत दारूचीं दुकानें नाहींत. कवडी नाणें प्रचारांत आहे. फक्त चांडाल लोकच खाटिकाचा धंदा करितात. '

( इ ) शिल्पकलेची अवनति—पाटलिपुत्रामधील अशोकाच्या राजवाड्यासंबंधीं फाहीन ह्मणतो कीं, " अशोकानें आपला वाडा दानवांकडून बांधून घेतला होता ! त्याच्या भिंतीवरील, दारावरील किंवा इतर दगडावरील नक्षीकाम मनुष्याच्या हातचें नाहीं. " यावरून असें स्पष्ट दिसतें कीं या वेळीं शिल्पकलेची अवनति झाली होती.

( ई ) मिरवणूक—फाहीनला बौद्धांची आणि ब्राम्हणांची एक जंगी मिरवणूक पहावयास सांपडली. याविषयीं तो असें लिहितो कीं, " मिरवणुकीकरितां ते एवढे टोलेजंग रथ तयार करतात कीं एक एक रथ एकाद्या मोठ्या देवळासारखा दिसतो. रथाभोंवतीं मलमलीचें वेष्टन असून त्यावर भडक रंगांत वेलबुट्टी काढलेली असते. नंतर या रथांत नानाप्रकारच्या अलंकारांनीं विभूषित केलेल्या विविध देवतांच्या मूर्ति नक्षीदार रेशमी छत्राखालीं बसवितात. एका मिरवणुकींत अशा प्रकारचे निरनिराळ्या तऱ्हेनें शृंगारलेले सुमारें वीस रथ असतात. " यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, यावेळीं सर्व धर्मांमध्यें भ्रातृभाव होता, आणि राजे लोक सर्वांनाच प्रोत्साहन देत असत.

( उ ) चिकित्सालय - देशांतील समस्त लोकांकरितां औषधालयांची योजना होती. येथें रोग्याच्या जरूरीप्रमाणें औषधांची, पथ्यपाण्याची, राहण्यासवरण्याची सर्व सुखसोय मोफत केली जात असे. त्या वेळीं अर्थातच बौद्धधर्म प्रचलित होता. त्याचा ऱ्हास होण्यास नुकताच आरंभ झाला होता. ताम्रलिप्तीहून चौदा दिवसांत फाहीन लंका देशास पोंचला. तेथें त्यानें ४१९ फूट उंचीचा एक स्तूप पाहिला. तसेंच त्याला एका संघारामांत–मठांत–पांच हजार भिक्षू रहात असलेले आढळले, आणि वीस फूट उंचीची व रत्नजडित अशी एक भगवान् बुद्धाची मूर्तिहि त्याला पाहण्यास सांपडली. लंकेहून एका व्यापारी जहाजांतून तो चीन

देशाकडे रवाना झाला. त्याच्याबरोबर दोनशें उतारू असून त्यांपैकीं अर्धे अधिक ब्राह्मण व्यापारी होते. जहाजावर कसलेंही होकायंत्र नसून तीं वाऱ्यानेंच जात होतीं. १७२ दिवस समुद्रांत भटकत भटकत शेवटीं बिचारा फाहीन कसातरी चीनच्या किनाऱ्याला लागला. फाहीन यानें गुप्तकालीं भारतवर्षाची धार्मिक, आर्थिक आणि राष्ट्रीय परिस्थिति प्रत्यक्ष पाहिली असल्यामुळें त्याच्या वर्णनावरून तत्कालीन लोकांचें सामाजिक व वैयक्तिक जीवित सुखदायक होतें असें स्पष्ट दिसतें.

१० गुप्तांचें विशेष–१ गुप्तांनीं कुशान साम्राज्याची सीमा सिंधुनदापर्यंत मागें रेटली, विदेशी राजघराण्यांचा नाश केला, आणि स्वदेश आक्रमण केलेल्या परदेशी लोकांना हिंदु करून सोडलें. सारांश, गुप्त राजे तुर्क, शक, हूण वगैरे शत्रूंपासून स्वदेशाचें संरक्षण करणारे आर्यसंस्कृतीचे कैवारी होते.

२ त्यांनीं संस्कृत विद्येला इतकें उत्तेजन दिलें कीं, त्या काळीं बोलण्यांत, लिहिण्यांत, ताम्रपट वगैरे खोदण्यांत आणि नाण्यावरहि संस्कृत भाषेचाच उपयोग केला जाई. या पुनरुज्जीवनानें, कनिष्कानें येथें आणिलेल्या मंगोलियन व ग्रीक संस्कृतींचे परिणाम नाहींसे झाले.

३ यावेळीं अखिल भारतवर्ष आर्यांच्या छत्राखालीं आल्यामुळें लष्करी वैभवाच्या कल्पनांचें आणि देशभक्तीच्या भावनांचें पुनरुज्जीवन झालें. यानेंच रजपुतांच्या महत्त्वाकांक्षेची ज्योत पाजळली. यांच्या अमदानींत बौद्धधर्माची बरीच पिछेहाट झाली.

४ परंतु बौद्धधर्माची झालेली अवनति आणि हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन हे बलात्कार, छल किंवा संकुचित मतें यांचे परिणाम नव्हेत. कारण गुप्त राजांनीं जरी हिंदु धर्माला आश्रय दिला तरी बौद्धधर्म व जैनधर्म या बाबतींत ते फारच सहिष्णु होते. बौद्धधर्माच्या अवनतीनें भारतदेश हीनवीर्य, दुबळा, व दुराचारी बनूं लागला होता. गुप्तकालानें विष्णु, शक्ति आणि कृष्ण यांच्या संप्रदायांचा प्रसार करून या अवनतीला आळा घातला.

५ गुप्तांच्या राज्याचा विस्तार पश्चिमेकडे समुद्रापर्यंत झाला असल्यामुळें त्यांच्या कारकीर्दींत चीन व पाश्चात्य देशांशीं आंतर्राष्ट्रीय व्यापार सुरू

होऊन राजकीय संबंध जडले, आणि त्यामुळें देशांतील सुधारणांची आयात-निर्यात झाली.

६ गुप्तांच्या अमदानींत वाङ्मय, गायन, चित्रकला, शिल्प, स्थापत्य-इत्यादिकांची असाधारण उन्नति झाली. अजंठ्यामधलि कांहीं भागांतील व एलोरा आणि एलिफंटा येथील जगत्प्रसिद्ध कोरीव लेणीं याच सुवर्ण-युगांत तयार झालीं. भारतीय शिल्पकलेमध्यें गुप्तकालीन शिल्पकामाला फार उच्च स्थान आहे. गुप्तांच्या वेळचे कारागीर धातूंच्या पत्र्यावर खोदकाम वगैरे करण्यांत फारच हुशार होते. दिल्ली येथील लोखंडी स्तंभ, व नालंदा येथील भगवान् बुद्धाची तांब्याची मूर्ति हीं त्या कारा-गिरांच्या कलानैपुण्याचीं उदाहरणें आहेत.

७ गुप्तांच्या कारकीर्दींत संस्कृत भाषेला उत्तेजन मिळालें हें वर सांगि-तलेंच आहे. त्यामुळें पुष्कळ पौराणिक वाङ्मय निर्माण झालें. वायु, विष्णु, मत्स्य व ब्रह्मांड या पुराणांतून गुप्त राजे व त्यांचे समकालीन इतर राजे यांची बरीच माहिती मिळते. यावरून हीं पुराणें गुप्तांच्या कालांत लिहिलीं गेलीं हें स्पष्ट आहे. त्याचप्रमाणें प्राचीन पुराणांचें पुनः संस्करण झालें.

८ गुप्तांनीं मोठ्या पराक्रमानें हूण लोकांना परतविलें व यांच्या रानटी व क्रूर अत्याचारांपासून भारतवर्षाचा बचाव केला. रोमच्या साम्राज्यावर त्यांना विजय मिळाल्यामुळें तेथें जे भयंकर वाईट परिणाम झाले, तसल्या परिणामांपासून हा देश सुरक्षित राहिला.

वरील सर्व विवेचनावरून असें स्पष्ट होतें कीं गुप्तवंशांत झालेले राजे फारच कर्तृत्ववान असून त्यांनीं दूर दूरवर विजय मिळविले व सुव्य-वस्थित राज्य स्थापिलें. त्यांच्या राज्यांत शान्तता व प्रबुद्धता नांदत होती. लोक सुखी, संपन्न व सुशिक्षित होते आणि कला, शास्त्र व वाङ्मय यांची निःसंशय प्रगति झाली होती. एकंदरींत गुप्तकाल म्हणजे आर्यावर्ताच्या जागृतीचें, वैभवाचें व संस्कृतीचें सुवर्णयुगच होय.

# प्रकरण ९ वें.

## कनोजचे सम्राट्.

१ शिलादित्य—गुप्तांचें साम्राज्य छिन्नभिन्न झाल्यावर इ. स. ५५० मध्यें प्रतापशील शिलादित्य स्थानेश्वराच्या सिंहासनावर बसला. हूण लोकांशीं शौर्यानें लढून त्यांना मध्य हिंदुस्थानाबाहेर हांकून देणाऱ्या वंशाचा तो संस्थापक होता. हुणांना हाकून दिल्यावर हा वंश उत्कर्ष पावला व त्यांत प्रभाकरवर्धन व राजवर्धनासारखे प्रतापशाली राजे झाले. त्यांच्याबद्दल खात्रीलायख भरपूर पुरावा त्यांच्या वेळचीं नाणीं, शिलालेख बाणाचे हर्षचरित्र व ह्युनसांगचीं पुस्तकें यांवरून मिळतो. त्याच्या दरबारीं मनोरथाचा शिष्य वसुबंधु हा कवि मोठ्या मान्यतेस चढला.

२ प्रभाकरवर्धन—इ. स. ५८० मध्ये शिलादित्याच्या पश्चात् गादीवर आला. याची आई गुप्तवंशांतील होती. यानें उत्तर पंजाबच्या हूणांचा दोन वेळां पराभव केला. तसेंच भीनमाल राजधानी असणारें गुजरांचें गुर्जर राज्यहि त्यानें काबीज केलें, व सिन्ध व माळवा हे देश जिंकून घेतले. यामुळें याला महाराजाधिराज परमभट्टारक असें म्हणत.

३ राज्यवर्धन—प्रभाकरवर्धनाचा पुत्र. हा आपल्या पित्याप्रमाणेंच शूर होता. माळवा आणि बंगाल यांच्या गुप्त राजांनीं कनोजचें राज्य हस्तगत करून स्थानेश्वरावर चढाई केली असतांना वीर राज्यवर्धनानें मालवाधिपति देवगुप्तास ठार करून कनोजच्या राजाचें रक्षण केलें. बंगाधिपति शशांकानें लबाडीनें राज्यवर्धनाचा वध केला, पण तो कनोज सोडून परत गेला.

४ हर्षवर्धन (६०६-६४७)—नंतर राज्यवर्धनाचा कनिष्ठ बंधु शिलादित्य ऊर्फ हर्षवर्धन हा वयाच्या १६ व्या वर्षींच गादीवर बसला. हा अत्यंत पराक्रमी, प्रतापी आणि धर्मप्रेमी राजा होता. विक्रमाच्या पश्चात् हाच भारतवर्षाचा सम्राट् झाला. याच्या पश्चात् भारतवर्षामध्यें बराच गोंधळ उडून गेला व पृथ्वीराजापर्यंत दुसरा कोणताही राजा सम्राट् झाला नाहीं ही दुःखाची गोष्ट आहे.

हर्षानें आपली बहीण कनोजची महाराणी राज्यश्री हिला शशांकाच्या हातून सोडवून आणून कनोजच्या गादीवर बसविलें, आणि तो स्वतः केवळ संरक्षक अगर प्रतिनिधि या नात्यानें कनोजमध्यें राहिला. हर्षाच्या कारकीर्दींतील मुख्य मुख्य गोष्टी खालीं दिल्या आहेत.

(१) हर्षाचें सैन्य फार बलाढ्य होतें. त्यांत ५० हजार पायदळ, वीस हजार घोडेस्वार व पांच हजार हत्ती होते, परंतु कांहीं वर्षांनीं तें सैन्य वाढलें. त्यात एक लक्ष घोडेस्वार व पुष्कळच जनावरे होती.

(२) सहा वर्षांच्या अवधींत त्यानें अनेक प्रदेश जिंकले आणि अव्याहत ३५ वर्षें उत्तर भारतवर्षाचें साम्राज्य उपभोगिलें. गुजराथचा वल्लभी राजा आणि कामरूपचा कुमार राजा हे त्याचे मांडलिक होते.

(३) काश्मीर, सिंध आणि पंजाब हे भाग मात्र तो हस्तगत करूं शकला नाहीं. तरी तेथील राजे त्याचे मांडलिक होतेच. चक्रवर्ती झाल्यामुळें त्यानें आपल्या नांवें नवीन शक सुरू केला.

(४) हर्षवर्धन दाक्षिणेकडे दिग्विजयास गेला असतांना, पुलकेशी राजानें पराभव करून त्याला मागें परत घालविलें अशा रीतीनें या कालापासून महाराष्ट्र देश उत्तरेच्या साम्राज्याची सत्ता झुगारून देऊन स्वतंत्र झाला.

(५) हर्षवर्धनाची राजधानी कान्यकुब्ज ( कनोज ) होती. याच्या काळीं प्रत्येक ५ व्या वर्षीं धर्मनिर्णय करण्याकरितां एक मोठी धर्मपरिषद् भराविण्यांत येत असे. या सभेंत हर्षवर्धन आपली सर्व संपत्ति दानधर्मांत खर्च करून आपणांस फक्त एक वस्त्र ठेवीत असे. चिनी प्रवासी ह्यूनसांग याला असली एक परिषद् पहावयास मिळाली होती.

(६) हर्षवर्धन पक्का बौद्ध होता. परंतु तो ब्राह्मण आणि जैन यांचाहि आदरसत्कार करीत असे.

(७) हर्षवर्धनाच्या दरबारीं मोठमोठे विद्वान् असून तो स्वतःहि मोठा विद्येचा भोक्ता व व्यासंगी होता. रत्नावली व नागानंद नाटकें त्याच्या नांवावर प्रसिद्ध आहेत. दण्डी कवीनें दशकुमारचरित्र याच कालीं लिहिलें. वासवदत्ता या ग्रंथाचा लेखक सुबंधु, मयूर शतकाचा कर्ता मयूर आणि ब्रह्मगुप्त हे याचवेळीं होऊन गेले. कादंबरीचा व हर्षचरित्राचा कर्ता सुप्रसिद्ध

बाणभट्ट याच राजाच्या दरबारीं असे. शृंगार, नीति व वैराग्य शतकांचा व भट्टिकाव्याचा लेखक सुप्रसिद्ध भर्तृहरी कवि हर्षाचाच समकालीन होता.

हर्षासारखा पराक्रमी, विद्वान्, सदाचारी आणि दानशूर राजा विरळा, ह्युनसांग म्हणतो, ' तो परम न्यायी व कर्तव्यपरायण होता. कर्तव्य आणि सत्कार्य यांच्यापुढें त्यानें झोंप आणि जेवण यांचीहि पर्वा केली नाहीं. आपल्या अखिल राज्यांत त्यानें मांसाशन व मद्यपान बंद करून टाकिलें होतें. सर्व धर्मकार्यांत तो अत्यंत तत्पर होता.'

**५ कनोजच्या साम्राज्याची अवनति**–हर्षवर्धन सुमारें इ.स. ६४७ मध्यें मृत्यु पावला. त्यानंतर पन्नास वर्षांतच कनोजचें साम्राज्य संकुचित झालें व त्याचें प्रचंड सामर्थ्य आणि प्रताप नामशेष झाला. गादीवर नामधारी दुबळे सम्राट् आले आणि अखेर काश्मीरचा राजा ललितादित्य यानें ७४० मध्यें कनोजवर स्वारी करून तेथील राजा यशोवर्मन् याचा पाडाव केला. भारतवर्षाचा एक महान् कवि **भवभूति**, तसेंच **वाक्पति** आणि **राजेश्वरी** नामक ग्रंथकार यशोवर्म्याच्या दरबारीं होते.

**६ कनोजचा भट्टवंश (८१०–१०९०)**–यशोवर्म्याच्या नंतरचा इतिहास उपलब्ध नाहीं. त्या वेळीं बहुधा हिंदु आणि बौद्ध यांचे तंटे व वादविवाद होत असावेत. ठिकठिकाणीं छोटे छोटे राजे राज्य करावयास लागले असून कनोजमध्यें युद्धवंशीय राजे राज्य करीत होते. ८१० मध्यें चक्रयुद्धाला गुर्जर जातीपैकीं परिहारकुलोत्पन्न नागभट्टानें जिंकलें आणि तेथें त्याच्या वंशजांनीं २२० वर्षें राज्य केल्यावर तें राठोडांच्याकडे गेलें.

**७ मिहिरभोज (८४०–९०)**नागभट्टाचा नातू. हा अत्यंत प्रतापी असून त्याच्या ताब्यांत राजपुताना, माळवा, गुजराथ, संयुक्तप्रांत व पंजाब हे भाग होते. याचीं नाणीं कोठें कोठें सांपडतात, त्यांवर शुक्राचें चिन्ह आहे. राष्ट्रकूट आणि राठोड यांच्याबरोबर याच्या पुष्कळ लढाया होत असत. याचा पुत्र **महेन्द्रपाल** ( ८९०–९०८ ). हाहि अत्यंत शक्तिमान् होता. याच्या दरबारीं प्रसिद्ध कवि राजशेखर रहात असे. याचा वारस **महीपाल** ( ९१०–४० ) याचा राठोडांनीं पराभव करून कनोज सर केलें, पण

थोड्याच अवधींत त्यांना परतावें लागलें. नंतर देवपाल, विजयपाल, राज्यपाल नामक राजे १०१९ पर्यंत येथें राज्य करीत होते; परंतु या दुर्बळ राजांच्या अमदानींत त्यांचे मांडलिक स्वतंत्र झाले. प्रसिद्ध विजेता महमूद गझनी यानें राज्यपालाचा स्नेह संपादन केला होता १०९० मध्यें कनोजमध्यें राठोडांचें राज्य स्थापन झालें. यांचा वृत्तांत पुढें योग्य स्थळीं दिला आहे.

८ ह्यूनसांगचा प्रवास—हर्षवर्धनाच्या काळीं, चीनचा प्रसिद्ध प्रवासी ह्यूनसांग इकडे आला होता. त्याच्या लेखांवरून तत्कालीन भारताची खरी स्थिति व्यक्त होते. ६३० ते ६४५ पर्यंत पंधरा वर्षें या देशांत राहून त्यानें पुष्कळ गोष्टींचें निरीक्षण केलें. उत्तरेंतील प्रसिद्ध प्रसिद्ध स्थळें पाहून तो ओरीसा आणि कलिंग यांवरून थेट दक्षिणेच्या टोंकापर्यंत गेला आणि महाराष्ट्र, गुजराथ, राजपुताना, सिंध या मार्गानें परत गेला. या समयीं, सर्वत्र सनातनधर्म पसरला असून बौद्धधर्म विशेषेंकरून काश्मीर, कामरूप, ओरीसा व दक्षिण या भागांत प्रचलित होता.

हर्षवर्धन अगर पुलकेशी यांच्या राज्यांचें ह्यूनसांगचें वर्णन अत्यंत चित्ताकर्षक आहे. पण स्थलाभावीं, देशाच्या सर्वसाधारण संस्कृतीसंबधीच्या त्याच्या वर्णनांतील व अभिप्रायांतील कांहीं उतारे पुढें दिले आहेत.

(१) भारतवासीयांचें शील—सर्वत्र प्रजा सुखी होती. पैशाची टंचाई कधींहि भासत नव्हती. लोक सरळ, साधे आणि सच्चे होते. ‘ ते हलक्या मनाचे नसून प्रामाणिक व आदरणीय आहेत. ते पैशाच्या व्यवहारांत निष्कपटी आणि न्यायाच्या कामीं गंभीर आहेत. या जन्मांतील दुष्कर्मांचीं वाईट फळें पुढील जन्मीं भोगण्यास लागतील ही भीति त्यांना सदैव असते. इहलोकच्या योग्य वस्तू ते तुच्छ समजतात. ते लोक लांडी लबाडी करणारे, दगा देणारे शठ नसून आपल्या वचनाला जागणारे असे सच्चे, सभ्यगृहस्थ आहेत. ’

(२) सामाजिक स्थिति-त्या वेळीं धनाढ्य लोक सुती, रेशमी आणि लोंकरी वस्त्रें वापरीत. तीं जरतारी कामानें चमकत असत. तीं फक्त स्पर्शानुमेय असून इतकीं तलम असत कीं, केवळ श्वासानेंहि उडत. राजेरजवाड्यांचे

आणि श्रीमान् मंडळींचे अलंकार मोठे चित्रविचित्र व विविध प्रकारचे असत. डोक्यावर माणिक मोत्यांचे हार, तुरे, बिंदी, शिरपेंच इ. आणि अंगावर हार, कंकणें, आंगठ्या वगैरे घालीत असत. बालविवाहाची पद्धत नव्हती. विधवाविवाह होत नसे. पडद्याची वहिवाट व सतीची चाल प्रचलित होती. परंतु स्त्रियांची सामाजिक स्थिति एकंदरींत प्रशंसनीयच होती, आणि त्यांना नाना विद्यांचें व कलांचें उच्च शिक्षण दिलें जात असे. चातुर्वर्ण्य सुरू झालें होतें आणि अस्पृश्यांचा पांचवा वर्णहि निर्माण झाला होता. परंतु असंख्य पोटजाती मात्र अस्तित्वांत आल्या नव्हत्या. प्रत्येक वर्ण संघटित व स्वतंत्र होता. त्या वेळीं भारतवर्षाचें असें थोर भाग्य होतें कीं, सर्वत्र स्वातंत्र्य आणि सहिष्णुता यांचें साम्राज्य दिसे. जगांत अशी स्थिति क्वचित्च सांपडते. अहिंसेचें तत्त्व लोकप्रिय झालें असल्यानें राजांनीं नियम करून हिंसा निषिद्ध केली होती.

(३) **कांहीं राजधान्याः**—ह्यूनसांगनें कांहीं राजधान्यांचेंहि पुढील-प्रमाणें वर्णन केलें आहेः—(१) जलालाबादची राजधानी नगरहार, हरिद्वार, मथुरा व स्थानेश्वर यांचे घेर चार चार मैल होते. (२) श्रीनगर २॥ × १ मैल होतें. (३) सतलज राज्याच्या राजधानीचा परिघ ३॥ मैल होता. या देशांत धनधान्य, फळें, सोनें, चांदी आणि रत्नें यांची समृद्धि होती. येथील लोक जरीची रेशमी आणि इतरही भारी किंमतीचीं सुंदर वस्त्रें वापरींत. त्यांचें आचरण नम्र आणि प्रसन्न होतें. (४) ओरिसा व कालिंग देशांच्या राजधान्यांचा घेर ५ मैल आणि आंध्र व बिहार देशांच्या राजधान्यांचे घेर आठ आठ मैल होते. कनोज व काशी हीं शहरें ४ × १ मैल होतीं.

(४) **कनोज**-ह्यूनसांग म्हणतो, "नगराच्या चौबाजूंस एक खंदक असून अमोरसमोर भक्कम आणि उंच बुरुज होते. तसेंच चहूंबाजूंचे कुंज, पूल, तळीं आणि तलाव नेहमीं आरश्याप्रमाणें चकाकत असत. येथें व्यापारी मालाची नुसती गर्दी लागून रहात असून देशदेशांतरींच्या हरतऱ्हेच्या मौल्यवान् वस्तू मिळत असत. लोक सुखी व संतुष्ट असून त्यांचीं घरें धनसम्पन्न आणि भरभक्कम होतीं. ते स्वभावानें प्रामाणिक व निष्कपटी

होते. त्यांना पाहिल्याबरोबर ते सज्जन आणि कुलीन आहेत अशीच खात्री पटे. त्यांना विद्येची विशेष गोडी होती. ”

(५) **अक्षयवट**–अक्षयवट म्हणून आज प्रसिद्ध असलेल्या प्रयागांतील वृक्षराजाचें ह्यूनसांगनें वर्णन केलें आहे. तदनंतर तो म्हणतो, ‘ गंगा-यमुनांच्या संगमावर दररोज शेंकडों मनुष्यें जलसमाधि घेतात. या देशांतील लोकांची अशी समजूत आहे कीं, तांदळाच्या एका दाण्यावर राहून उपवास केला आणि येथें संगमावर येऊन समाधि घेतली कीं स्वर्ग मिळतो.’

(६) **काशीचे** नागरिक धनाढ्य असून त्यांच्याजवळ मोठमोठ्या अमूल्य वस्तू होत्या. येथील लोक कोमल अंत:करणाचे व दयाळू असून विद्याव्यासंगी होते. तेथें १०० फूट उंचीची एक महेश्वराची तांब्याची मूर्ति होती. तिचें स्वरूप गंभीर आणि तेजस्वी असून ती अगदीं सजीव दिसे.

(७) नैर्ऋत्येच्या बाजूस **चरित्र** नामक एक मोठें बंदर होतें. ‘ येथील व्यापारी दूरदूर देशांचा प्रवास करतात. येथें विदेशी लोकांचीहि येजा असून, त्यांचा मुक्कामहि होतो. नगराचा तट उंच आणि भक्कम आहे. येथें हरतऱ्हेच्या अद्भुत आणि अमूल्य वस्तु मिळतात.’

(८) **माळव्यासंबंधीं** तो म्हणतो, “विद्येकरितां दोन देश प्रसिद्ध आहेत. नैर्ऋत्येकडे एक माळवा आणि ईशान्येकडे मगध.”

‘ **गुजराथची** जमीन, हवापाणी, लोक वगैरे माळव्यापासून निराळे आहेत. वल्लभीची वसती दाट आहे आणि संपत्ति अफाट आहे. येथें जवळ जवळ शंभर कोट्याधीश आहेत.’

**विद्यालयें**– ह्यूनसांगच्या वेळीं नालंदा, विक्रमशिला आणि वल्लभी येथील विश्वविद्यालयें (Universities) सर्वोत्कृष्ट होतीं.

नालंदा येथील विश्वविद्यालय आश्रम पद्धतीचें ( किंवा Residential-Teaching Type ) होतें. तेथें विद्यार्थ्यांची राहण्याची, जेवण्याची, शिक्षणाची वगैरे सर्व सोय मोफत होत असे. विद्यार्थ्यांची संख्या सुमारें ४००० असे. या संस्थेनें दोनशें खेडेगांवांची जागा व्यापिली असून त्यांत आठ भव्य दिवाणखाने व दोनशे प्रशस्त दालनें होती. ह्यूनसांग तर येथील शिल्पकाम

पाहून गारच झाला. तो म्हणतो, ' तेथील वेधशाळांसारख्या इमारतींचीं गगनचुंबी शिखरें प्रभातकालीं ढगांत अदृश्यच होत असत.' पॅरीस, ऑक्सफोर्ड वगैरे सारख्या विश्वविद्यालयांनीं, त्यांच्या स्थापनेनंतर पांच सातशें वर्षांनंतरही हेवा करावा असाच त्या वेळीं नालंदाच्या व्यवस्थेचा, तेथील आचार्यांचा व कुलपतींचा लौकिक होता. ह्या विद्यालयाचा इतिहास म्हणजे या देशाच्या लोकांच्या रचनाचातुर्याचें व बुद्धिवैभवाचें उत्कृष्ट उदाहरण आहे.

---

# प्रकरण १० वें.

## रजपूत काल

१ नवी विटी, नवें राज्य-आठव्या आणि नवव्या शतकांचा इतिहास अंधाराच्या पडद्याआडच दडलेला आहे. पडदा उघडतो तों दहाव्या शतकाची नवी विटी व नवें राज्य दृष्टीस पडतें व मनास विस्मय वाटतो. प्रत्येक स्थळीं नवीन नवीन नांवें, नव्या जाती, नवे धर्म, एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे नवीन राष्ट्र दृष्टीस पडतें. बौद्धधर्माचा पूर्वींपेक्षां अधिक ऱ्हास झालेला असून सनातनधर्माचा प्रचंड प्रसार होऊन राहिला होता. अयोध्या आणि पाटलिपुत्र यांच्या ठिकाणीं दिल्ली, कनोज, अजमीर, अनहिलवाडा, अलोर, सिंध, लाहोर, श्रीनगर, काबूल, धार, कालिंजर, गौड, बादामी, कल्याण, कांची, तेलंगण, देवगिरी, द्वारसमुद्र, मदुरा, इत्यादि नगरांत रजपूत राज्यें स्थापिलीं गेलीं होतीं. म्हणजे भारतवर्षाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत रजपुतांचें अखंड राज्य पसरलें होतें.

१ रजपुतांचीं ३६ कुलें असून त्यांतील सूर्यवंशी, चंद्रवंशी, यादववंशी व अग्निवंशी हीं प्रसिद्ध आहेत. यांतील मुख्य कुलें पुढें दिलीं आहेत. गुहलोट, चौहान ( चव्हाण ), कच्छवाह, चालुक्य, चंदेल, बुंदेल, वल्लभी, तोमार, राठोड, प्रमार, पुरिहार, बाघेल, गुर्जर, कालाचूरी. हीं कुलें राज्य

करीत असतांना बंगाल्यांत पाल व सेन, ओरीसांत केसरी व गंग, काश्मीरांत कर्कोट, उत्पाल व लोहार, आणि दक्षिणेंत पल्लव, होयसाल, चालुक्य व राष्ट्रकूट या रजपूत कुलांचीं राज्यें होतीं.

२ **रजपुताचा स्वभाव**—या वेळचे रजपूत लोक सनातनधर्माभिमानी, सुशील, पराक्रमी, समरशूर, बलाढ्य योद्धे, देशहितैषी, स्वार्थत्यागी असे वीर होते. ते अत्यंत साधे व सरळ असून कपट, लपंडाव वगैरेंचा त्यांना गंधहि नव्हता. शौर्य तर त्यांच्या रोमरोमांत भिनलें होतें आणि देशाकरतां व धर्माकरितां ते प्राणहि देण्याला तयार असत. त्यांच्या शौर्याच्या तेजानें मुसलमानी अमदानींतील मध्ययुगीन भारताचा इतिहास चमकत राहिला असून, अखिल जगांत या जातीला तोड मिळणार नाहीं अशी खात्री पटते. पण मुसलमानानीं या जातीचा कपटानें, भेदनीतीनें आणि जुलमानें पराभव केला. दाही दिशा अधर्म माजून छलाचें आणि कपटाचें साम्राज्य असतांना मुत्सद्देगिरीनें न वागतां, निर्विकार व उदासीन रहाणें म्हणजे आपला आपण घात करून घेण्यासारखें आहे. रजपूत लोक सद्गुणांचे पुतळे असूनहि त्यांच्या निष्कपटी व भोळया स्वभावाने कारस्थानी मुसलमानांच्या पुढें त्याचा टिकाव न लागल्यामुळें हा देश कित्येक शतकें मुसलमानांच्या आधीन होऊन राहिला.

३ **चितोड आणि उदेपूर (उदयपूर) येथील गुहलोत**—या वंशाच्या उत्पत्तिविषयीं खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. कर्नल टॉडच्या मताप्रमाणें श्रीरामाचा वंशज अयोध्यापति कनकसेन यानें इ.स १४५मध्यें आपलें वडिलार्जित राज्य सोडून सौराष्ट्र (काठेवाड) देशांत वसाहत केली. पुढें विजयसेन नामक त्याच्या एका वंशजानें त्याच देशांत बिजयपूर वसविलें. या वंशाची राजधानी भावनगरजवळ वल्लभीपूर म्हणून नगरी होती. तेथें त्यांचें २०० वर्षे राज्य झाल्यावर, शिलादित्यराजाला हूणांनीं ५२४ मध्यें ठार केले. त्याची राणी पुष्पवती हिला एका गुहेंत पुत्र झाला. त्याचें नांव **गुह** किंवा **गुहलोत** ठेवण्यांत आलें. त्यानें ईदर शहरीं आपलें राज्य स्थापिलें आणि यापुढें सहाजिकच त्याच्या वंशाचें नांव गुहलोत असें पडलें. सुमारें दोनशें

वर्षांनंतर जगद्विख्यात बाप्पा रावळानें इ. स. ७२८ मध्यें परमारांपासून चितोड तोडून घेतलें. १५६७ पर्यंत त्याच्या वंशजांची राजधानी चितोडच होती. भारतेतिहासांत चितोडचा किल्ला अत्यंत प्रसिद्ध आहे. येथेंच आपल्या अतुल व अद्भुत शौर्यानें मुसलमान शत्रूंशीं लढत असतांना अनेकदां रजपूत वीरांनीं आपलीं नांवें अजरामर करून ठेविलीं आहेत. इ, स १५६७ मध्यें महाराणा प्रतापसिंहाचा पिता उदयसिंह यानें उदयपूर नगर वसविलें. या वंशाची अजूनहि हीच राजधानी आहे. उदयपूरचे महाराणे सूर्यवंशी आहेत, आणि खरोखर अस्सल रक्त, अतुल पराक्रम, आणि अद्भुत वीर्य यांमुळें ते समस्त हिंदुभारताचे भास्करच होत

४ **दिल्लीचे तोमार**—इंद्रप्रस्थाचें ( दिल्लीचें ) राज्य हजारों वर्षें पांडुवंशाकडेच होतें. नंतर सुमारें इसवी सनारंभापासून ८०० वर्षांपर्यंत हा वंश गादीवर नव्हता. पण पुन्हां अनंगपाल नामक राजपुत्रानें इ.स. ७९२मध्यें दिल्लीस आपलें राज्य स्थापून तोमारांचें गेलेले वैभव परत मिळविलें, आणि आपलें मलिन यश उज्ज्वल केलें. यांच्या वीस पिढ्यांनीं सुमारें ३८० वर्षें राज्य केलें. शेवटचा राजा **अनंगपाल** निपुत्रिक असल्यानें त्यानें आपलें राज्य आपला नातू पृथ्वीराज चौहान [ चव्हाण ] यास दिलें.

५ **अजमीर व दिल्ली येथील चव्हाण**—हे अग्निकुलोत्पन्न रजपूत, शौर्य प्रतिष्ठा, थोरपणा, औदार्य वगैरे क्षात्रगुणांमध्यें कोणालाहि हार जाण्यासारखे नव्हते. या वंशाचा मूळ पुरुष **अनहिल** याच्यापासून शेवटच्या पृथ्वीराजापर्यंत एकंदर ३९ राजे झाले. यांतील [१] **अजयपालनें** अजमीर शहर वसविलें. तेथेंच चौहान मोठे कीर्तिमान् झाले. [२] वीरोत्तम **माणकराय** यानें मुसलमानी विजेता महंमद बिन कासीम हा चढाई करून आला असतांना त्याच्या सैन्याचा मोड करून त्याला परत हांकलून दिलें. यानंतर तीनशें वर्षेंपर्यंत हिंदुस्थानावर कोणीही स्वारी केली नाहीं. **विशालदेव** आणि पृथ्वीराज हे या वंशांत महान् तेजस्वी कुलदीपक होऊन गेले. [३] विशालदेवानें सर्व उत्तर भारतवर्षांत आपल्या विजयाची ध्वजा फडकाविली, मुसलमानांना पंजाबापर्यंत हांकून लाविलें, आणि इ.स.११५१ त

दिल्लीचा राजा अनंगपाल याला आपली मुलगी सोमेश्वरला देण्यास आणि सोमेश्वराचा मुलगा दिल्लीच्या राज्यावर बसविण्यास भाग पाडिलें. यामुळें इ० स० ११७० मध्यें आनन्गपालाच्या मृत्यूनंतर विशालदेवाचा नातू पृथ्वीराज चव्हाण ( संभर आणि अजमीर यांचा राजा ) याला दिल्लीचेंहि राज्य मिळालें. (४) पृथ्वीराज हा भारतवर्षाचा शेवटचा सम्राट् होय. चांद-भाट कवीनें पृथ्वीराजरास नामक काव्यांत याचा पूर्ण इतिहास दिला आहे.

चव्हाण वंशांतील राजे हल्लीं सिरोहि, कोटा आणि बुंदी येथें राज्य करीत आहेत. जोधपूरचे राठोड व जयपुरचे कुशावाहा यांचा संबंध मुसलमानी इतिहासाशीं बराच असल्यामुळें ती माहिती दुसऱ्या भागांत दिली आहे.

६ **माळव्यांतील परमार अगर पवार**—सोळंकी, पुरीहार, आणि चोहान कुलांप्रमाणेंच पवार रजपूतहि **अग्निकुलोत्पन्नच** होते. अग्निकुलांत प्रथम यांनींच राज्य मिळविलें आणि मोठ्या पराक्रमानें पश्चिम भारत आपल्या ताब्यांत घेतलें. महिष्मति, ( महेश्वर ) धार, मांडु, उज्जयनी, महु, पर्मावती, अमरकोट आणि पट्टण हीं निरनिराळ्या वेळीं राजधानीचीं शहरें होतीं.

वरील कुलांतील २५ शाखांनीं या ठिकाणीं राज्य केलें. दुसऱ्या शतकांत यांचें राज्य गुजराथमध्यें होतें. वल्लभी वंशांतील शेवटचा राजा शिलादित्य याची राणी पुष्पवती, गुहलोटची आई, ही प्रमार कुलांतीलच असून तें कुल महिष्मती येथें राज्य करीत होतें. निदान एवढें खास कीं, सातव्या शतकामध्यें महाराज हर्षवर्धनाच्या राज्याचा लोप झाल्यावर विन्ध्यपर्वताच्या शिखरावर धारा व माण्डु हीं नगरें वसवून परमार राजे माळव्यामध्यें राज्य करूं लागले.

**(१) राम आणि मुंज**—पराक्रमी राम पवारानें तेलंगण देशांत स्वतंत्र राज्य स्थापन केलें आणि दुसऱ्या अनेक स्वतंत्र राजांनाहि जिंकून घेतलें. पण या वंशांतील सर्वांत प्रसिद्ध राजा मुंज महाराज होय. हा महापराक्रमी व विद्येचा भोक्ता असून चांगल्यापैकीं कविहि होता. असें सांगतात कीं, तैलप चालुक्यानें माळव्यावर १५ वेळां स्वाऱ्या केल्या, परंतु मुंज

राजानें प्रत्येक वेळां त्यास परतवून लावलें. तथापि इ. स. ९९५ मध्यें मुंजानें मात्र मोठी सेना जमा करून चालुक्य राज्यावर चाल केली तेव्हां त्याचा पराभव होऊन तो स्वतःहि मारला गेला.

(२ भोज–माळव्यामध्यें राज्य करणारे भोज नामक तीन राजे झाले. अनुक्रमें ५७५, ६६५, १०४४ मध्यें ते राज्यावर बसले. हे तीन्ही विद्यानुरागी तसेच महापराक्रमी होते. परंतु त्यांतल्या त्यांत तिसरा भोज(१०४४-८८ ) हा त्याचा पराक्रम, विद्येची आवड, दरबाराचा थाट आणि तत्कालीन संस्कृत भाषेचा उत्कर्ष इत्यादिकांमुळें विक्रमादित्या ( विक्रमाजित् ) प्रमाणें विशेष प्रसिद्ध आहे. त्यानें ज्योतिष, स्थापत्य, राजव्यवस्था यांजवर कांहीं पुस्तकें रचिलीं आहेत. तसाच हा स्वतः कवि असून विद्वानांचा मोठा गौरव करीत असे. याच्या पदरींहि नऊ प्रसिद्ध पंडित होते. संस्कृतविद्येच्या अभिवृध्द्यर्थ त्यानें धारानगरमिध्यें एक विश्वविद्यालय उघडलें. तसेंच भोजपूरनजीक भोजपाल नांवाचा तलाव बांधला. हा तलाव १५ व्या शतकापर्यंत दुरुस्त होता. दक्षिणी चालुक्यांशीं आणि गुजराथच्या व चेदीच्या राजांशीं युद्ध करीत असतां, भोज राजा चेदिराज कर्णदेवाकडून दुर्दैवानें मारला गेला. पुढील पिढ्या दुबळया झाल्यामुळें मुसलमानांना तोंड देऊं शकल्या नाहींत. अल्लाउद्दीन खिलजीनें माळवादेश पूर्णपणें जिंकून घेतला आणि मुसलमानांच्या हातीं जाऊन उज्जैनीचें प्राचीन वैभव नष्ट झालें.

७ चालुक्य अगर सोळंकी–अग्निकुलांपैकीं दुसरा वंश. भारतवर्षांतील अनेक दूरदूरच्या देशांवर याचें राज्य असल्यामुळें हा फार प्रसिद्ध झाला.

(१) दक्षिणेमध्यें या रजपुतांचें राज्य बादामी, वेंगी आणि कल्याण येथें अनेक शतकें होते. याचा संक्षिप्त वृत्तांत दक्षिणेच्या इतिहासांत दिला आहे.

(२) गुजराथी चालुक्य---गुजराथच्या भिन्न भिन्न भागांमध्यें यांच्या तीन शाखांनीं इ. स. ८०० मध्यें तीन राज्यें स्थापिलीं. गुजराथच्या नैर्ऋत्य भागांत त्यांचे राज्य सहाशें वर्षें राहिलें; परंतु मध्य आणि उत्तर गुजराथेंतील त्यांचे राज्य इ. स. १२९८ मध्यें अल्लाउद्दीनानें नष्ट केलें.

८ **बंगालमधील रजपुत राजे**—अंग व वंग देशांतील रहिवाश्यांना महाभारतांत म्लेंच्छ व ऐतरेय ब्राह्मणांत पौंड्र आणि पुलिन्द म्हटलें आहे, कारण त्या पतित आर्यजाति होत्या. बंगालच्या प्राचीन इतिहासावरील पडदा, एकदम हर्षवर्धनकालीं वंगाधिप शशांकानें राजवर्धनाला ठार केलें तेव्हां उघडतो. आठव्या शतकामध्यें बंगाल्यांत पालवंशीय रजपुतांचें राज्य सुरूं झालें. सुमारें ११६० पर्यंत १७ राजांनीं बिहारमध्यें राज्य केलें, आणि कांहीं काल तर त्यांच्या स्वामित्वाखालीं अखिल बंगाल प्रांत होता. हे राजे बौद्ध होते. बालंदा, काशी, आणि उदन्तपुर येथें बौद्धांचीं विहार व विश्वविद्यालयें हीं बाराव्या शतकाच्या अखेरपर्यंत अस्तित्वांत होतीं.

९ **पालवंशाची स्थापना** गोपालराजानें केली. यानें मगधदेश पादाक्रांत केला. या वंशांतील धर्मपालराजा महान् शक्तिमान् असून दिल्लीपासून बंगालच्या उपसागरापर्यंत त्याच्या राज्याचा बिस्तार होता. कनोजहि त्याच्याच ताब्यांत होतें. नंतर देवपालानें ओरीसा जिंकला. यांचें राज्य हिमालयापासून विंध्य पर्वतापर्यंत पसरलें होतें.

**राजपालाचें राज्य** बंगालपासून कनोजपर्यंत होतें. याच्या कारकीर्दींत महमुद गझनवीनें कनोजवर स्वारी केली. **महिपालानें** ५२ वर्षें राज्य केलें. ओरीसाप्रांत याच्याच ताब्यांत होता; परंतु याच्या मृत्यूनंतर बंगालचा पूर्व भाग सेनवंशी रजपूत विजयसिंह यानें बळकाविला. पालवंशी राजे मगधामध्यें इ. स. ११७८ पर्यंत राज्य करीत होते. पुढें हा वंश नष्ट झाला.

**बंगाल्यांतील सेनवंशी राजे**—विजयसेनानें पूर्वबंगालचें राज्य पालवंशाकडून कमाविल्याचा वृत्तांत वर आलाच आहे. याचे तीन पूर्वज समुद्रकिनाऱ्यावर राज्य करीत असून त्यापैकीं मूळ संस्थापक आदिसूर हा प्रसिद्ध आहे. यानें बंगाल्यामधील विद्वानांची वाण पाहून कनोजच्या पांच ब्राह्मणांना व पांच कायस्थांना तेथें बोलाविलें. या वंशाचें राज्य सुमारें १२७४ पर्यंत चाललें. बल्लाळसेनानें ( १०६६ ते ११०६ ) बंगालचे पांच विभाग केले. उत्तर, पश्चिम, पूर्व, मिथिला आणि दुआब. या वंशांतील शेवटचा राजा लक्ष्मण यास बख्त्यार खिलजीच्या मुलानें ११९९ मध्यें

स्वदेशांतून हांकलून लावून तेथें मुसलमानी राज्याची स्थापना केली. सेन राजे हिंदु असल्यानें पालवंशानंतर बंगाल्यांत व बिहार यांत बौद्धधर्माचा ऱ्हास होऊन सनातन धर्माची भरभराट झाली. सेनवंशाची राजधानी डाकानजीक विक्रमपुरही होती.

१० काश्मीराचे रजपुत—काश्मीर देश जगांतील अत्यंत सुंदर व रमणीय देशांपैकीं एक असून तो हिंदुस्थानांतील नंदनवन ह्मणूनच प्रसिद्ध आहे. या देशाचा इतिहास कल्हणकृत राजतरंगिणीवरून इ. स. ११४८ तागायत मिळतो. कल्हणानें दिलेला प्राचीन इतिहास बराच चुकीचा आहे. कारण कीं, त्यानें दिलेल्या अशोक, कनिष्क, आणि मिहिरकुल यांच्या तारखा इतिहाससिद्ध तारखांपेक्षां हजार वर्षांनि प्राचीनतर आहेत. पण दुर्लभवर्धन राजापासून पुढील मित्या बरोबर आहेत.

काश्मीरांत ५२७ पासून ११२८ पर्यंत तीन वंश झाले. कर्कोटक ५९८–८५५, उत्पाल ८५५–१००३, लोहार १००३–११२८. इतर प्रान्तापासून हा देश अलग असल्यानें अनेक शतकें त्यानें स्वातंत्र्य उपभोगिलें. अखेर १३३९ मध्यें शाहमीर नामक मुसलमानानें त्यावेळीं काश्मीरच्या गादीवर असलेल्या राणीला पदच्युत करून राज्य आपल्याकडे घेतलें. पुढें अकबरानें तें आपल्या राज्यास जोडिलें.

११ रजपूत कालांतलि हिंदुसंकृतीचा— विचार करणें योग्य आहे. याबद्दल अलबरुनीकृत पुस्तकांत माहिती मिळते. या मुसलमानी इतिहासकाराचा जन्म खिवा शहरांत इ. स. ९७३ सालीं झाला. इ. स. १०१७ मध्यें महमुद गझवीनें एका युद्धामध्यें याला पकडून गुलाम केलें. तो दीर्घकालपर्यंत हिंदुस्तानांत राहिला व त्यानें आपल्या इतिहासांत हिंदूंच्या बऱ्याबुऱ्या गोष्टींचा विचार केला.

प्रसिद्ध स्थळें—आलबरुनीनें आपल्या इतिहासांत कनोज, मथुरा, प्रयाग, वाराणसी, पाटलिपुत्र, मोंगेर, गंगोत्री, उज्यैनी, काश्मीर, मुलतान, रामेश्वर, मालदीव, व लखदीव बेटें इत्यादि स्थळांचें वर्णन केलें आहे.

शूद्र व वैश्य यांना वेदाध्ययनाचा अधिकार नव्हता, इतकें असूनसुद्धां त्या वर्णांपैकीं कोणीही वेदवाचन केलें असें समजल्यास त्याची जीभ छाटण्यांत येई. त्यामुळें जिकडे तिकडे अज्ञान पसरलें.



**वामन देवालयांतील खोदकाम.**

[ दहाव्या शतकांतील रजपुतांची शिल्पकला ]

हें बुंधेल खंडांत खाजुराव शहरीं आहे.

[ पृष्ठ १७

बालविवाह प्रचारांत होता व विधवाविवाह निषिद्ध मानण्यांत येई. शिवाय लग्नाचे नियमसुद्धां फार कडक होते.

हिंदुलोकांत मूर्तिपूजा फारच जोरांत होती. ब्रह्मा, विष्णु, महेश, कृष्ण वगैरे देवांचीं बरींच मंदिरें होतीं. तरी सुशिक्षित हिंदुलोक एकाच परमेश्वराची पूजा करीत.

मद्यपान शूद्रांशिवाय इतर जातींत निषिद्ध मानलें जात असे. ब्राह्मणवर्ग व मुमुक्षुमंडळी याशिवाय इतर लोक मांसाशन करीत.

शूद्रांशिवाय दुसरा कोणीही व्याजानें पैसे घेत नसे. सैल विजारी वापरण्यांत येत असत व डोक्याला पटका आणि अंगावर दागिने घालीत असत. साधारण लोक जिनाशिवाय घोड्यावर बसत. बुद्धिबळाचे खेळांत बरेच लोक निपुण होते. विद्येचा चांगला प्रसार होता. भूर्जपत्रें व ताडपत्रें यांचा पुस्तकें लिहिण्याकडे उपयोग करीत. स्थापत्य व शिल्पकलादिकांची फारच उन्नति झाली होती. आल्बरुनी म्हणतो कीं, “जर मुसलमान लोकांनीं हे मोठमोठे तलाव पाहिले तर ते आश्चर्यमूढ होऊन त्यांचें वर्णन करण्याला असमर्थ होतात; मग प्रत्यक्ष कार्य बाजूसच राहिले.”

यावरून असें स्पष्ट होतें कीं, त्यावेळीं कलाकौशल्याच्या बाबतींत हिंदुस्थान शिखराला पोहोंचलें होते परंतु पुढील दोन शतकांत मुसलमानी स्वाऱ्या व मूर्तिभंजनादि क्रूर कृत्यें यांनीं या कलेला उतरती कळा लागली.

दोन शतकांपूर्वीं सुद्धां हिंदुस्थानांत आलेल्या मुसलमानी यात्रेकरूंनीं व व्यापाऱ्यांनीं आल्बरुनीप्रमाणेंच आपलें मत प्रदर्शित केलें आहे.

अबुझईदचें म्हणणें आहे कीं, हिंदुस्थानचे पुष्कळसे राजे आपल्या राण्यांनाही दरबारांत नेऊन आपले शेजारीं बसवीत; त्यांच्यामध्यें कसल्याही प्रकारच्या पडद्याची चाल नव्हती.

सुलेमान नांवाचा व्यापारी म्हणतो कीं, पूर्वबंगालचें राज्य फारच संपत्तिमान् होतें. तेथील राजा ५०००० हत्तींसहित लढाईवर जात असे. या ठिकाणीं कापसाचा कपडा इतका तलम निघे कीं, त्यांचा सर्व पोशाख एका आंगठींतही राही.

एखाद्या हिंदू राजानें दुसऱ्या हिंदु राजाचा पराभव केला, तर तें राज्य विजयी राज्याला न जोडतां पराजित राजवंशांतीलच एकादा राजपुत्र गादीवर बसविण्यांत येत असे, कारण पराजित राज्यांतील लोक परस्थ राजाला आपल्यावर राज्य करूं देत नसत.

अल्मसुदी नामक प्रवाशानें याच्याही पूर्वी दोन शतकें असेच उद्गार काढिले होते कीं, बहुतेक लोक मद्यपान करीत नव्हते; इतकेंच नव्हे तर राजाला सुद्धां मद्यपानाची बंदी होती व जर एकादा राजा मद्यपी आढळला, तर त्याला पदच्युत करण्यांत येई. ही मद्यपानबंदी धार्मिक आडकाठीमुळें नसून बौद्धिक सुधारणेच्या दृष्टीनें होती.

१२ **रजपूतकालीन जातिव्यवस्था**:-या जातिव्यवस्थेचा विचार करण्यापूर्वी आपण तिचा उगम व विकास कसा झाला तें पाहूं.

रोटी व बेटीव्यवहाराच्या बाबतींत कांहीं कुटुंबें कांहीं निर्बंध पाळीत असत. अशा नियमित निर्बंधानें अंतस्थ निगडित झालेलीं जीं कुटुंबें त्यांस जाति असें म्हणतात. जात जन्मतः ठरलेली असते, हा त्यांतील विशेष असून, पूर्वीच्या जातींतून बहिष्कृत झाल्याशिवाय किंवा दंड दिल्याशिवाय ती जात सोडतां येत नाहीं.

**जातिव्यवस्थेचा विकास**:—वैदिककालीं या प्रकारची जातिव्यवस्था अस्तित्वांत नव्हती. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्ग धंद्यावरून ठरविले जात. यामुळें एका वर्णांतून दुसऱ्या वर्णांत सहज जातां येत असे.

अथर्ववेद, ब्राह्मण ग्रंथ व उपनिषदें यांवरून असें दिसतें कीं, त्यावेळीं ब्राह्मणवर्गाला भलतेंच महत्व देण्यांत येत असे; तरी पण त्या वर्णांत सर्वांना प्रवेश खुला असे.

धर्मसूत्रांच्या काळापूर्वी जातीला वंशपरंपरेचें स्वरूप आलें; व प्रत्येक जातीनें आपली पवित्रता राखण्याच्या हेतूनें विवाह व धर्मविधि यांच्याद्वारें कडक निर्बंध घातले. तरी उच्च व नीच वर्णांचे परस्पर विवाह नेहमीं होतच असत. मात्र प्रतिलोमविवाहाच्या संततीला वर्णसंकर असें म्हणत. नवव्या शतकापर्यंत सुद्धां जातिव्यवस्थेंतील निर्बंध विशेष रीतीनें पाळले जात नसत; या वेळींसुद्धां उद्योगधंद्यांवरूनच जात ठरविण्यांत

येई. ख्रि. पू. चवथ्या शतकांतील मेगॅस्थिनीस, सातव्या शतकांतील चिनी लेखक आणि आठव्या व नवव्या शतकांतील मुसलमानी इतिहासकार हे आपल्या काळीं लोकांचे सुमारें सात वर्ण होते असें लिहितात. त्या वेळीं आर्य लोकांशिवाय व्रात्य, चांडाळ वगैरे लोक होते, याबद्दल संशय नाहीं. परंतु त्यांना आर्यांच्या गोटांत घेण्याचीं साधनें उपलब्ध होतीं.

जातिव्यवस्थेचीं कारणें:—[१] अनार्य व पतितार्य यांचें आर्यांशीं मिश्रण झाल्यामुळें जातिव्यवस्थेचे निर्बंध फार कडक करण्यांत आले. [२] ग्रीक, शक, हूण, पल्लव, द्राविड, भिल्ल, कोल व नागादि सर्व प्रसृत हिंदुसमाजांत एकरूप होऊन गेले होते. त्यांतील पुष्कळांना तर उच्च सामाजिक दर्जा प्राप्त झाला होता. परंतु या लोकांशीं रोटी व बेटीव्यवहार करण्याचे पुष्कळ घराण्यांनीं नाकारलें. [३] धंदा आणि वर्ण यांच्यावरून जातींचा दर्जा व पावित्र्य हीं ओळखलीं जात असत. उद्योगश्रेणी व संघ यांच्या निर्बंधामुळें असंख्य जाती निर्माण झाल्या. [४] इतर देशांपासून हिंदुस्थान देशाची अलिप्तता, त्याचा विस्तार व तज्जन्य परस्परांच्या दळणवळणांतील अडचणी यामुळें जातिभेद दृढतर झाले. [५] परंतु या सर्व कारणांतही श्रेष्ठ, मुसलमानांचें हिंदुस्थानांतील प्रभुत्व होय. यानें या वर्णांना स्वावलंबी बनवून त्यांच्या असंख्य पोटजाती पाडिल्या. तरी पण या ठिकाणीं हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे कीं, याच असंख्य जातींमुळें मुसलमानी सत्तेखालील बऱ्याच शतकांत हिंदु व हिंदुत्व यांचें निःसंशय रक्षण झालें.

१३ हिंदुधर्माचे प्रसिद्ध प्रचारक—इ. स. ७०० ते १२०० पर्यंत पौराणिक धर्माचे बरेचसे त्यागी व महाविद्वान् उपदेशक झाले. उदाहरणार्थ, कुमारिलभट्ट, शंकराचार्य, रामानुज, माधव इत्यादि. प्रत्येकानें आपल्या दृष्टीनें तत्त्वज्ञान व धर्म यांचा जोराचा प्रसार केला.

(१) कुमारिल भट्ट:—यानें सहाव्या अथवा सातव्या शतकांत बौद्ध व जैन या दोन मतांस बराच विरोध केला; व प्राचीन वैदिक धर्माच्या पुनरुद्धाराकरितां आपला प्राण दिला. यानें पुष्कळशीं पुस्तकें लिहिलीं असून त्यांत तंत्रवार्तिक हें फार प्रसिद्ध आहे.

(२) शंकराचार्यः–यांनीं सुद्धां आठव्या व नवव्या शतकांत बौद्ध धर्माचा विध्वंस करून सनातन वैदिकधर्माचा पुनरुद्धार केला. हे आपल्या विद्वत्तेबद्दल जगद्विख्यात असून भारतवर्षाचें भूषण आहेत. यांच्या नांवाचा पाश्चात्य लोकांमध्यें विशेष गौरव केला जातो. शृंगेरी, बदरीनाथ, द्वारका, जगन्नाथपुरी, कोल्हापूर, संकेश्वर इत्यादि ठिकाणीं यांचीं धर्मपीठें आहेत व त्यांच्या द्वारें अद्वैतमताचा प्रसार केला जातो.

(३) श्रीरामानुजः–यांनीं ११व्या व १२व्या शतकांत विशिष्टाद्वैत मताचा प्रसार केला. यांनीं मायावादाचा व जैनमताचा हिंदुस्थानांतील प्रभाव नाहींसा करण्याकारितां जिवापाड मेहनत करून ते त्यांत यशस्वी झाले. ( यांच्या अनुयायांना वैष्णव म्हणतात. ) यांनीं संसारोत्पादक परमेश्वराचें विष्णुरूपांत वर्णन केलें.

(४) मध्वाचार्यः– हा भारतविख्यात आचार्य दक्षिणेंत कर्नाटक प्रांतीं उदेपी नगरासमिप सन ११८९ मध्यें जन्मास आला. त्याचा पिता शंकराचार्यांचा अनुयायी असून शैव होता. पण या मताचा मध्वाला लवकरच कंटाळा आला व त्यानें या विरुद्ध द्वैतमताचा प्रसार केला. शृंगेरीच्या जगद्गुरूस पराजित करून तो उत्तरेस गेला व बनारस, हरिद्वारादि ठिकाणीं राहून वेदान्तसूत्र व भगवद्गीता इत्यादि ग्रंथावर टीका लिहिली. या संप्रदायाचे लोक कृष्णोपासक आहेत.

---

## प्रकरण ११ वें.

### दक्षिणी राज्यांचा इतिहास.

१ विंध्य पर्वतापासून कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशाला दक्षिण किंवा दक्षिणापथ असें म्हणत असत. समुद्रशोषी अगस्त्यऋषीच्या वेळेपासून दक्षिणेस आर्यांची वसाहत सुरू झाली. श्रीरामचंद्र सम्राट् झाल्यानंतर आर्य वसाहती व संस्कृति यांचा प्रसार विशेष होऊं लागला. या ठिकाणीं नेहमीं

छोटीं छोटीं राज्यें राज्य करीत होतीं. त्यांचा सुसंबद्ध इतिहास पूर्णपणें प्रसिद्ध नाहीं. व तो येथें देण्याची आवश्यकताही नाहीं. फक्त त्यांतील मुख्य मुख्य राज्यांचा व त्यांतीलही महत्वाच्या राजांचा आपण या ठिकाणीं विचार करूं.

## २ आन्ध्रवंश ( खि. पू. २२० ते इ. स. २३६ )

**आन्ध्रराज्याची स्थापना**—गोदावरी आणि कृष्णा या नद्यांच्या मधला देश आन्ध्रांचा. या देशात तीस मोठी शहरें असून शेकडों गांवें होती. चंद्रगुप्ताचे वेळीं आन्ध्रसेनेमध्यें एक लक्ष पायदळ, एक हजार हत्ती, व दोन हजार घोडेस्वार होते. परंतु चंद्रगुप्तानें किंवा बिंदुसारानें तिचा पराजय करून आन्ध्र देश आपल्या साम्राज्यास जोडला. अशोकाचें सामर्थ्यवान् साम्राज्य लयास गेल्यावर कलिंग आणि आन्ध्र स्वतंत्र झाले. मौर्यांची सत्ता झुगारून देणारा पहिला स्वतंत्र राजा सीमूक (खि. पू. २२० ) व त्याचे वंशज शातवाहन व शातकर्णी आणि त्यांचे वंशांतील तीस राजे यांनीं सलग ४५६ वर्षें राज्य केलें. यापैकीं कांहीं राजे बलाढ्य असून त्यांचा इतिहास पुढें थोडक्यांत दिला आहे.

**३ आन्ध्र राज्याचा विस्तार**—सीमूकानंतरचा राजा कृष्ण यानें नाशिक व पश्चिम महासागरापर्यंतचा सारा मुलुख जिंकला. त्याच्या वंशजांनींही तोच क्रम चालू ठेवून अखेर तेरावा राजा शातशातकर्णी यानें मगध प्रांतही आपल्या राज्यास जोडला; तो पुढें अनेक वर्षें आन्ध्रांच्याच ताब्यांत होता.

**४ हाल**—सतरावा राजा. वाङ्मयाभिवृद्धीसाठीं केलेल्या उद्योगाबद्दल हा प्रसिद्ध आहे. त्यानें स्वतः प्राकृत भाषेमध्यें बृहत्कथा आणि सप्तशति हे ग्रन्थ व संस्कृतमध्यें कातल नामक व्याकरण लिहिलें.

**५ दुसरा विलिवायुकर**—तेविसावा राजा. याची २५ वर्षांची अमदानी मोठ्या कष्टाची गेली. कारण (१) शक व पल्लव लोक, आणि माळवा, गुजराथ, व काठेवाड येथील यवन त्यास एकसारखा त्रास देत असत; पण अखेर या वीरानें त्या सर्वांना चीत केलें. (२) त्यावेळीं शकांचा अधिपति क्षत्रप नहपान होता. तो धर्मभ्रष्ट असून अत्याचार करीत असे, यामुळें वर्णसंकर होण्यास सुरवात झाली होती. (३) ब्राह्मणधर्माची अव-

नति होऊं लागली होती. परंतु वायुकर राजानें नहपानाचा बंदोबस्त करून आपल्या धर्माचें रक्षण केलें. (४) चष्टन नामक शक क्षत्रप पश्चिम हिंदुस्थानावर नेमला होता. परंतु त्यानें आन्ध्रांची सत्ता झुगारून दिली आणि तो माळव्यामध्यें स्वतंत्र राज्य करूं लागला. चष्टनचा नातू रुद्रदमन यानें आपली मुलगी दक्षमित्रा, ही विलिवायुकराचा पुत्र पुलियायी यास दिली. परंतु रुद्रदमनानें आपल्या जांवयावरही चढाई करून बरेच विजय मिळविले. शेवटीं सुराष्ट्र, कच्छ, सिंध, कोंकण आणि माळवा हे प्रान्त आन्ध्रापासून पश्चिमेच्या क्षत्रपांच्या ताब्यांत आले. पुलियायीनें आपली राजधानी कोल्हापुराहून पैठाणला नेली आणि तेथें बत्तीस वर्षें राज्य केलें.

६ सत्ताविसावा राजा यज्ञश्री—( इ. स. १८४—२१३ ). यानें क्षत्रपानें जिंकलेला आपला कांहीं प्रान्त परत मिळविला आणि समुद्रकिनाऱ्यावरील कांहीं प्रान्तही आपल्या राज्यास जोडला. याच्यापुढें आंध्रराज्यास उतरती कळा लागली. या राज्याचा संपूर्ण इतिहास उपलब्ध न होण्याचें कारण नक्की सांगतां येत नाहीं. तरी एवढें खास कीं, या वंशानें दीर्घकाल राज्योपभोग घेतला. इतिहासामध्यें इतक्या दीर्घ राजवटीचीं उदाहरणें क्वचित्च सांपडतात.

७ बौद्ध व ब्राह्मण धर्मांची स्थिति–त्या वेळच्या श्रीमंत व धंदेवाईक लोकांत चैत्य व मठ बांधण्याची अहमहमिकाच लागून राहिली होती. बौद्ध भिक्षूंच्या चातुर्मासांतील वास्तव्यासाठीं व जलपर्यटणाचे सोईसाठीं बऱ्याच धर्मशाळा बांधिल्या होत्या असें दाभोळ, बाणकोट, राजापूर, गोवा इ. स्थाडींतील धर्मशाळांवरून समजतें. अशा प्रकारें बौद्ध धर्माचा उत्कर्ष व प्रसार होत असला तरी ब्राह्मण धर्म लुप्त झाला नसून सुस्थितींत होता, असें त्यावेळीं ब्राह्मणांना दिलेल्या गोदानांसारख्या दानांवरून सिद्ध होतें.

याविषयीं एक विदेशीय ग्रन्थकार आपल्या पेरिप्लस् नामक ग्रंथांत म्हणतो—

खालीं दिलेलीं आधुनिक शहरें परदेशाच्या व्यापाराचीं केंद्रें होतीं:— भडोच, पैठण, धरुर, सुपर, कल्याण, चौल, महाड, जयगड, विजयदुर्ग, नाशिक, कऱ्हाड, कोल्हापूर. या स्थानांपासून पश्चिम आशिया, जपान, चीन



**अमरावती स्तूप.**

[ इसवी सनाच्या दुसऱ्या शतकातील आंध्राची शिल्पकला ]

( पृष्ठ १०२ )

इ. देशांशीं व्यापार होत असे. भारतीय वकील व रोमचे वकील यांची नेहमीं परस्परांकडे ये जा असे. व्यापारवृद्धीकरितां व्यवसायसमित्या (Guilds), निगमसभा, नागरिकसभा, ग्रामसभा व परस्परसहाय्यक मंडळ्या, इत्यादि सभा स्थापन केल्या होत्या. या सभांच्या द्वारा तत्कालीन प्रजेचा राज्यव्यवस्थेंत बराच प्रवेश होई. याप्रमाणें आन्ध्रवंशाचे वेळीं भारताची राष्ट्रीय, सामाजिक आणि आर्थिक परिस्थिति प्रशंसनीय असल्याचें दिसून येते.

८ **उत्तरेंतील आणि दक्षिणेंतील पल्लव**—आंध्रवंशाचा शेवट झाल्यावर दक्षिणेंत अनेक छोटे छोटे राजे राज्य करूं लागले. यांपैकीं पल्लव, चालुक्य आणि राष्ट्रकूट राजे प्रसिद्धीस आले. उत्तरेंतील पल्लव बदामी व वेंगीपूर येथें राज्य करीत होते. बदामी येथें त्यांनीं सुमारें इ. स. ३०० ते ५५० पर्यंत राज्य केल्यावर तेथून चालुक्यांनीं त्यांना हांकून दिलें; त्याचप्रमाणें त्यांचें वेंगीचें राज्य सुद्धां सुमारें इ.स. ६१५ मध्यें चालुक्यांनीं घेतलें. त्यांचा इतिहास चालुक्यांच्या इतिहासांत समाविष्ट केला आहे; व कांचीमध्यें राज्य करीत असलेल्या दक्षिणी पल्लवांची माहिती पुढे दिली आहे.

९ **बादामीचे चालुक्य**—हे मूळचे रजपूत. ते उत्तरेंतून खालीं उतरले आणि दक्षिणेवर राज्य करूं लागले. या वंशाचा संस्थापक **जयासिंह** नामक रजपूत होता. त्याचा पुत्र **रणराग** एक यथार्थनामा शिवभक्त राजा होऊन गेला. त्यानंतर त्याचा पुत्र प्रतापशाली पहिला **पुलकेशी** यानें राज्याचा थोडा विस्तार करून एक अश्वमेध यज्ञ केला, व बादामीमध्ये राजधानी स्थापिली. त्याचे पुत्र **कीर्तिवर्मा** व **मंगलेश** यांनीं पूर्व व पश्चिम कोंकणांतील मौर्यवंश आणि नलवाडीचा नलवंश यांचा नाश करून आपलें राज्य वाढविलें. कीर्तिवर्म्याचा पुत्र **दुसरा पुलकेशी** (इ.स. ६०८ ते ६४२) हा या वंशांत एक अत्यंत शक्तिमान्, राजनीतिकुशल आणि उत्साही असा राजा होऊन गेला. (अ) यानें वेंगी, गुजराथ, लाट, माळवा, बनवासी, कोंकण, चेर, चोल व पांड्य इत्यादिकांच्या राजांशीं एकसारखे युद्ध करून त्यांना जिंकलें. (आ) उत्तरेचा महाराजाधिराज **हर्षवर्धन** यानें दक्षिणेवर स्वारी केली असतां त्याचा पराभव करून मोठीच मर्दुमकी गाजविली व हर्षवर्धनाचा हर्ष मालविला. (इ) कांजीवरमच्या पल्लव राजांशीं घनघोर संग्राम

करून पुलकेशीनें विजय मिळाविले. (ई) पुलकेशीच्या शौर्याच्या व विजयाच्या बातम्या दूरदूर पोहोंचून तो जगद्विख्यात झाला होता. इ. स. ६२५ मध्यें इराणचा शाह दुसरा खुसरू यानें आपला एक वकील पुलकेशीच्या दरबारांत पाठविला होता. याच्या सन्मानाचे एक सुंदर चित्र अजंठा लेण्यांतील एका भिंतीवर खोदलें आहे. (उ) या राजाचा भपकेदार दरबार, चिनी प्रवासी ह्यूनसांग यानेंही [ इ. स. ६४१ मध्यें ] पाहिला होता. (ऊ) परंतु इ. स. ६४२ मध्यें पल्लवांचा जय झाला, चालुक्यांची राजधानी वातापी (बादामी) लुटली गेली व पुलकेशी मारला गेला.

१० चालुक्यांचा उत्कर्ष व अपकर्ष—पुलकेशीच्या विजयी पुत्रानें आपल्या पित्याच्या मृत्यूचा सूड घेण्याच्या इराद्याने कांचीच्या पल्लवांचा पराभव करून त्यांचा देश उध्वस्त केला. लढाईचा धुमाकूळ चाललाच होता. केव्हां चालुक्यांचा विजय होत असे; केव्हां पल्लवांचा होत असे. अखेर विनयादित्य, विजयादित्य व विक्रमादित्य या तिघांनीं दक्षिणेकडील पल्लव व इतर राजे यांच्याशीं अनुक्रमें युद्ध करून विजय मिळविला.

दुसऱ्या विक्रमादित्याच्या दोन्ही राण्यानीं पत्तादकाल येथें त्रैलोकेश्वराचे व लोकेश्वराचें देवालय बांधून आपल्या राज्याची कीर्ति अजरामर केली; परंतु दैवदुर्विलासानें त्याचा पुत्र दुसरा कीर्तिवर्मा याला राष्ट्रकूटांचा राजा दंतिदुर्ग यानें राज्यभ्रष्ट करून आपलें राज्य सुमारें इ. स. ७५३ त स्थापन केलें. अशा रीतीनें चालुक्यांच्या मूळ वंशाचा शेवट झाला तरी, त्यांची एक शाखा वेंगीमध्यें व दुसरी गुजराथमध्यें राज्य करीत होती. शेवटीं इ. स. ९७३ मध्यें तैलप चालुक्यानें राष्ट्रकूटांचा पराभव करून आपल्या पुरातन वंशाची बादामीच्या गादीवर पुनः स्थापना केली.

११ धार्मिक स्थिति—चालुक्यांच्या वेळीं जैन व पौराणिक मतांचें महत्त्व वाढलें. कवि रविकीर्ति वगैरे जैन पंडितांना चालुक्य राजांच्या दरबारांत चांगला मानमरातब मिळत असे. जैन मताचा प्रचार विशेषतः दक्षिण महाराष्ट्रांत असून इतरत्र पौराणिक मत पसरत होतें. ब्रह्मा, विष्णु, महेश्वर यांची पूजा होऊं लागली. शेंकडों मंदिरें उभारलीं गेलीं, शिवाची पूजा त्याच्या घोर कापालिकेश्वराच्या स्वरूपांत



चौमुख देवालय ( पालिताना )

[ पृष्ठ १००

होऊं लागली, वेदशास्त्रसंपन्न पंडितांना देणग्या मिळूं लागल्या, अश्वमेधादि यज्ञ पुष्कळ होऊं लागले, संस्कृत साहित्याची वृद्धि होऊं लागली व बौद्धांच्या अनुकरणानें ब्राह्मण मडळी गुहांमध्यें देवालयें तयार करूं लागली. यापैकीं मंगलेश राजानें बादामीमध्यें बांधविलेलें सुंदर मंदिर अजून अस्तित्वांत आहे. बौद्धधर्माला उतरती कळा लागली होती; तरी त्यावेळीं त्यांच्या अनेक चैत्यमंदिरादि इमारती होत्या असें ह्यूनसांगच्या वर्णनावरून समजतें.

१२ राष्ट्रकूटवंश ( इ. स. ७५३ ते ९७३ )— राष्ट्रकूट हे जन्मतः रजपूत क्षत्रिय असून आरबी इतिहासकारांनीं त्यांना बल्लाळ नावानें संबोधिलें आहे. यांनाच रठ्ठ असेंहि म्हणतात, व महाराष्ट्र हें नांव त्यांच्याच वरून पडलें. या वंशांत दंतिदुर्ग पहिला स्वतंत्र राजा झाला. हा आपल्या विजयानें उन्मत्त होऊन आपल्या प्रजेला त्रास देऊं लागल्यानें, बहुतकरून त्याचा चुलता कृष्ण यानें त्याचें राज्यपद घेतलें. त्यानें मूळ चालुक्यांचा सारा देश पादाक्रांत केला. वेरुळच्या लेण्यांतील जगप्रसिद्ध असें **कैलासमंदिर** खोदविल्यामुळें हा कृष्ण राजा भारतीय इतिहासांत अमर होऊन राहिला आहे हीं लेणीं शिवाजीमहाराजांच्या पूर्वजांच्या वेरुळ जहागिरीजवळ आहेत. कैलासमंदिर अत्यंत सुंदर व भव्य असल्यामुळें अद्वितीय आहे त्यांतील मूर्तिही फार विशाल होत्या व त्यांना कृष्ण राजानें बहुमोल जवाहिरानें सजविलें होतें. असें मंदिर बांधणाऱ्या जातीची व राजाची आम्हांस कधींहि विस्मृति पडणें शक्य नाहीं.

कृष्णाच्या नंतर दुसरा गोविंद, ध्रुव व तिसरा गोविंद, हे गादीवर बसले; व दक्षिणेकडे कांचीपर्यंत आणि उत्तरेस गुजराथ व माळव्यापर्यंत गोविंदानें देश काबीज करून आपलें राज्य दक्षिण हैद्राबादेपर्यंत वाढविलें. इतकेंच नव्हे तर, आपली एक शाखा गुजराथेमध्यें वसवून तेथील राज्याचाही कांहीं भाग आपल्या अंमलाखालीं आणिला. तिसरा गोविंद किंवा त्याचा मुलगा यांनीं आपली राजधानी मालखेडास [मान्यखेतास] नेली.

१३ **पहिला अमोघवर्ष** [ इ. स. ८१५ते८७७ ]-तिसऱ्या गोविंदाचा मुलगा. यानें पुष्कळ वर्षें राज्य केलें. याच्या काळीं पश्चिम हिंदुस्थानांत

आलेला सुलेमान नांवाचा आरबी व्यापारी असें म्हणतो कीं, अमोघवर्ष हिंदुस्थानांतील मोठ्या राजांत मोडत असे. इतकेंच नव्हे तर चीन, रूम व बगदाद इत्यादि देशांच्या राजाधिराजांप्रमाणेंच तोही एक प्रसिद्ध चक्रवर्ति राजा होता. तो फार संपत्तिमान् व ऐश्वर्यसंपन्न असल्यामुळें कणेरीच्या सुप्रसिद्ध प्राचीन कोरीव लेण्यांतील लेखांत त्याला राजाधिराज असें म्हटलें आहे. त्यानें जैनधर्म स्वीकारला होता व दिगंबर जैनपण्डिताना तो फार मान देत असे. याच्यानंतर सुमारें शंभर वर्षेंपर्यंत आठ राजांनीं राज्य केलें. या कालांत राष्ट्रकूटांची सत्ता कमी होऊं लागली. चालुक्याच्या वंशांतील राजा दुसरा तैलप यानें राष्ट्रकूटांचा राजा दुसरा कर्क यास ठार मारून आपला लुप्तवंश पुनः इ. स. ९७३ मध्यें उदयास आणिला.

**धार्मिक स्थितिः**—वरील राजांनीं पौराणिक धर्माचीं मंदिरें स्थापन केलीं व संस्कृत वाङ्मयाला उत्तेजन दिलें. त्याच वेळीं कांहीं राजांनीं जैन धर्माचाही प्रचार केला. याचा परिणाम असा झाला कीं, बौद्धधर्माचा हळूहळू अपकर्ष होऊं लागला पहिल्या अमोघवर्षानें बांधिलेल्या कांहीं इमारतींशिवाय या कालच्या बौद्ध इमारतींचीं वर्णनें आढळत नाहींत.

## कल्याणीचे चालुक्य (९७३ ते ११८७ इ. स.)

१४ **तैलप ते जयसिंह्** कर्कराजास धुळीस मिळवून तैलपानें चालुक्याची लक्ष्मी परत आणिल्याचें वृत्त वर आलेंच आहे. निजाम राज्यांतील कल्याणी त्याची राजधानी होती; त्यामुळें या वंशाला कल्याणीचे चालुक्य म्हणतात. या वंशांतील पहिला राजा तैलप हा मोठा पराक्रमी असून त्यानें माळवा पादाक्रांत करून तेथील प्रसिद्ध परमार राजा मुंज यास ठार केलें. चेदी व चोल राजांचाहि त्यानें पराभव केला. त्याचे वंशज सत्याश्रय आणि विक्रम यांनीं चोलांवर विजय मिळविला. तदनंतर जयसिंहानें माळवा, चोल व चेर देश जिंकले. परंतु त्याचें दुर्दैवच बलवत्तर! माळव्याच्या सुप्रसिद्ध भोजराजानें आपला चुलता मुंज याच्या वधाचा सूड उगवण्याकरितां जयसिंहाचा शिरच्छेद केला. जयसिंहाचा मुलगा पहिला सोमेश्वरहि प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्याच्यासारखे वीर्यशाली राजे दुर्मिळ




कैलास मंदीर.

(पृष्ठ १०५

आहेत. त्याची कारकीर्द म्हणजे विजयांची एक मालाच होय. चोल, सौराष्ट्र, माळवा, दशार्ण (भिलसानजीक), आसाम, वंग, द्रविड इत्यादि देशांचा पराभव करून त्यांच्याकडून त्यानें खंडणी वसूल केली. याच्या काळीं चालुक्यांचें राज्य फारच भरभराटीस आलें. त्याच्या पश्चात् या अवाढव्य राज्यास त्याच्या पुत्रांमधील यादवीमुळें दुर्बलता आली.

१५ **दुसरा विक्रमादित्य**—हा दुसऱ्या सोमेश्वराचा भाऊ. यानें नुकत्याच खालावलेल्या राज्यावर ५० वर्षें चांगलें राज्य करून त्याचा जवळ जवळ पुनरुद्धार केला. (२) हा मोठा प्रतापी, रसिक व विद्वानांचा आश्रयदाता होता. प्रसिद्ध काश्मिरी पंडित बिल्हण व याज्ञवल्क्य स्मृतीवरील मिताक्षर टीका लिहिणारे पंडित विज्ञानेश्वर याच्याच पदरीं होते. (३)यानें राज्यविस्ताराकडे फारसें लक्ष न देतां आपल्या राज्याला स्थैर्य आणण्याचा प्रयत्न केला; तथापि गोवा, कोंकण आणि चोल देश त्यानें पादाक्रांत केले.

१६ **चालुक्यांचा अपकर्ष**–दुसऱ्या विक्रमादित्याचा मुलगा तिसरा सोमेश्वर यानें आंध्र, द्रविड, मागध याच्याशीं लढून आपलें राज्य सांभाळिलें खरें; परंतु त्याचे दोन वंशज दुर्बल होते. त्याचें साम्राज्य मोठें असलें तरी त्याचे शत्रूही पुष्कळच होते. शेवटीं इ. स. ११६२ मध्यें दुसऱ्या तैलपाचा मुख्य मंत्रि विज्जन यानें आपल्या धन्याला पदच्युत करून आपल्या कालाचुरी वंशाची स्वतंत्र गादी स्थापन केली. विज्जनाचा ब्राम्हण मंत्रि बसवा यानें लिंगायत किंवा वीरशैव पंथ स्थापन केला. हा पंथ जैन व ब्राम्हण यांच्या धर्म-सिद्धांतांचा निषेध करीत होता; व जातिव्यवस्था मोडून सामाजिक सुधारणा करणें हें त्याचें ध्येय होतें. विज्जन व त्याचे दोन वंशज यांनीं इ. स. ११८२ पर्यंत राज्य केलें. परंतु याच वर्षीं तैलपाचा मुलगा चवथा सोमेश्वर यानें तें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. अखेर उत्तरेकडील यादवांचा राजा भिल्लम व दक्षिणेकडील होयसाळ यादव राजा वीर बल्लाळ यांनीं चवथ्या सोमेश्वराचा पराभव केला; व देवगिरी येथें भिल्लमनें यादवांची गादी इ. स ११८७ मध्यें स्थापिली; त्यामुळें याच वर्षीं कल्याणीच्या चालुक्यांच्या विशाल राज्याचा अंत झाला; तरी याच वंशाच्या कांहीं शाखा कित्येक ठिकाणीं राज्य स्थापून राहिल्या. त्यांपैकीं एक

शाखा संगमेश्वरास राज्य करीत होती. त्यांतील सोमदेव नांवाच्या एका राजानें कोल्हापुरांतील अंबाबाईस एक गांव इनाम दिलें, असा उल्लेख अंबाबाईच्या एका शिलालेखांत सांपडतो.

**१७ कोल्हापुरांतील शिलाहार वंश**—कोल्हापुरचा इतिहास आपल्याला खि.पू ३०० वर्षांपूर्वीपासूनचा सांपडतो. त्या वेळीं कोल्हापूर हें बौद्धांचे एक मोठें केंद्र व पवित्र स्थान होतें. आंध्रांचा राज्यविस्तार झाल्यावर कोल्हापूर त्यांची पश्चिम राजधानी झाली. त्या वेळचें वर्णन टॉलेमीनें दिलें आहे. त्यांत कोल्हापूरला त्यानें " हिपोक्युरा " या नांवानें संबोधिलें आहे. यांच्यानंतर, बादामीचे चालुक्य, राष्ट्रकूट आणि कल्याणीचे चालुक्य यांची सत्ता या प्रान्तावर होती. या सर्व राजांचीं नाणीं त्या त्या देशांत थोडीं थोडीं आजही सांपडतात. यानंतर शिलाहार वंशानें आपली सत्ता या ठिकाणीं प्रस्थापित केली.

**१८ शिलाहार या नांवाचीं तीन घराणीं** महाराष्ट्रांत वेगवेगळया ठिकाणीं राज्य करीत होतीं. तीं राष्ट्रकूटांच्या कालीं अस्तित्वांत आलीं होतीं. त्यांतील एक उत्तर कोंकणांत, व दुसरें दक्षिण कोंकणांत प्रस्थापित झालें असून तिसरें घराणें कोल्हापूर, मिरज व कऱ्हाड या ठिकाणीं राज्य करीत होतें. त्यांची राजधानी प्रथम पन्हाळा व नंतर कोल्हापूर होती. म्हणून त्यांना कोल्हापुरचे शिलाहार असें म्हणतात. पुढें त्यांच्या प्रांतांत दक्षिण कोंकणही सामील झालें. हें घराणें सर्वांत शेवटचें असून राष्ट्रकूटांच्या अपकर्षाच्या वेळीं याची स्थापना झाली. यांतील पाहिले कांहीं राजे लहान लहान मांडलिक असून ते नेहमीं शेजारच्या राजांपासून आपल्या राज्याचें रक्षण करण्यांत गुंतलेले असत. विजयार्कांच्या नंतर त्याचा मुलगा दुसरा भोज यानें पन्हाळगडावर ( पद्नालदुर्ग किंवा पन्नालदुर्ग यावर ) राज्य केलें. याला शिलाहार महामंडलेश्वर असेंही म्हणत. याच्याच कारकीर्दींत सोमदेव नांवाच्या जैन पंडितानें पूज्यपादकृत संस्कृत व्याकरणावर ' शब्दार्णवचंद्रिका ' या नांवाची टीका लिहिली.

कल्याणीचा राजा तैलप याचा मंत्री विजन यानें कोल्हापुरच्या राजांच्या सहाय्यानें तैलपाचें राज्य बळकाविलें; नंतर कोल्हापूरच्या राजांना मांड-



हाळ्बीद येथील होयसाळेश्वर मंदिरांतील खोदकाम. [ पृष्ठ १०८

लिक करण्याच्या उद्देशानें त्यानें कोल्हापूरवर चाल केली, व त्यांत त्याला बरेंच यश आलें. कालाचुरी वंशांतानंतर भोज स्वतंत्र झाला, परंतु देवगिरीचा यादव राजा सिंघण यानें इ. स. १२०५ च्या सुमारास त्याचा पाडाव करून कोल्हापूरचें राज्य आपल्या राज्याला जोडलें. हे शिलाहार राजे विद्या, कलाकौशल्य व स्थापत्य यांचे मोठे आश्रयदाते होते; त्यांनीं कोल्हापूर येथील महालक्ष्मी व विठोबा यांचीं देवालयें व खिद्रापूर येथील मंदिरें सुशोभित केलीं. त्यांचा जैनधर्माकडे कल असून त्या धर्माच्या प्रसारार्थ त्यांनीं अनेक जैनमंदिरें व मठ स्थापिले.

१९ **होयसाळ राजे**—हे चालुक्यांचे पश्चिम घाटांतील मांडलिक असून विष्णुवर्धनाची कारकीर्द सुरूं होईपर्यंत ते स्वतंत्र नव्हते. विष्णुवर्धनानें [इ.स. १११० ते ११४१] राज्यविस्तार बराच केला. कलाकौशल्य व शिल्पकला बरींच वाढविलीं व धार्मिक बाबतींतही यानें पुष्कळ सहाय्य केलें, यामुळें तो कीर्तिमान् झाला. विष्णुवर्धन हा जैनधर्मी असून चोलांनीं उध्वस्त केलेलीं जैन देवालयें दुरुस्त करण्यासाठीं त्यानें आपला प्रधान गंगराज याला बरेंच प्रोत्साहन दिलें. बाराव्या शतकाच्या प्रारंभीं रामानुजस्वामींच्या शिकवणीमुळें तो वैष्णवपंथांत आला. अनुपम सौंदर्याचीं मोठमोठीं वैष्णव देवालयें बांधून त्या सांप्रदायाचा त्यानें प्रचार केला. तो स्वतः वैष्णव होता तरी त्याचे कुटुंबांतील मंडळी जैनधर्मी असून तीं सर्व एके ठिकाणीं गुण्यागोविंदानें रहात असत; यावरून तो सर्वधर्मसहिष्णु होता असें स्पष्ट दिसतें.

२० **होयसाल पद्धतीचीं देवालयें** फार भव्य व विशाल असून त्यांच्या भोंवतीं बरीच जागा खुली असे. हत्ती, घोडे, सिंह आणि निरनिराळ्या जनावरांच्या व देवतांच्या लहानमोठ्या मूर्ति खोदून भिंती सुशोभित केलेल्या असत. यांपैकीं त्यांच्या हळेबीड राजधानींतील होयसालेश्वर देवालय फार प्रसिद्ध आहे.

## यादव वंश ( इ. स. ११८७–१३१८ ).

२१ **उद्भव**—यादवांची पहिली राजधानी सुप्रसिद्ध मथुरा होती. परंतु श्रीकृष्णानें द्वारकेस राज्य करण्यास सुरवात केली. तेथें या वंशाचें

राज्य कित्येक शतकें चालू होतें. शेवटीं सुमारें ( डॉ. भांडारकरांच्या मताप्रमाणें ) इ. स.७९५ मध्यें यांचा एक वंशज दृढप्रहार यानें आपलें राज्य दक्षिणेंत स्थापन केलें. हे स्वतःला " विष्णुवंशोद्भव " म्हणवीत असत.

२२ चंदोरचे यादवः--यांची राजधानी चंद्रादित्यपूर ( नाशिक जिल्ह्यांतील चन्दोर ) होती; त्यामुळें त्यांना चंदोरचे यादव म्हणतात. या वंशांत २२ राजांनीं इ.स.११९१पर्यंत सुमारें४००वर्षें राज्य केलें. यांचा इतिहास हेमाद्रिकृत व्रतखंड आणि एक ताम्रपट यांपासून थोडासा समजून येतो; परंतु वंशावलीपलीकडे कांहीं फारसें समजत नाहीं.

२३ देवगिरीचे यादव---यांची राजधानी स्थापणारा चन्दोरचा शेवटचा राजा भिल्लम होय. या धैर्यशाली, नीतिज्ञ, पराक्रमी राजानें इ. स. ११८७ पूर्वीं द्वारसमुद्राच्या यादववंशी होयसाळ राजाचा पाडाव करून कांहीं देश हस्तगत केला. नंतर कालाचुरींच्या बंडामुळें व होयसाळेश्वरांच्या स्वाऱ्यांमुळें कमजोर झालेल्या चालुक्यांचा पराभव करून व देवगिरीमध्यें राज्य स्थापून यानें त्याला विविध साधनांनीं बळकटी आणिली. होयसाळाची सत्ता हि अगदीं नामशेष झाली नव्हती. त्यानें यादवांच्या नवीन स्वाऱ्यांचा मोठ्या शौर्यानें प्रतिकार केला. किती तरी घोर लढाया झाल्या; व एकांत तर यादवांना हार खावी लागली. अशा प्रकारें यादवांना दक्षिण महाराष्ट्र जिंकितां आलें नाहीं व त्यामुळें सुमारें तीस वर्षें त्यांना गुपचुप बसावें लागलें. भिल्लमचें राज्यविस्ताराचें कार्य त्याचा पुत्र जैत्रपाल यानें शिथिल होऊं दिलें नाहीं. अनेक लढाया करून त्यानें तेलंगण पादाक्रांत केलें. जगद्विख्यात गणिती व ज्योतिषी भास्कराचार्य यांचा पुत्र पंडित लक्ष्मीधर हा जैत्रपालाच्या दरबारांतलि पंडितशिरोमणी होता. श्रीभास्कराचार्यांनीं सिद्धांतशिरोमणि, गोलाध्याय, बीजगणित, करणकुतूहल व लीलावती हीं पुस्तकें लिहून भारतवर्षाचें नांव उज्ज्वल केलें आहे.

२४ सिंघण-(१) यानें बराच राज्यविस्तार केला. हा महापराक्रमी असून याच्या महाराजाधिराज, पृथ्वीवल्लभ, विष्णुवंशोद्भव, द्वारावतीपुराधीश्वर वगैरे पदव्या प्रसिद्ध आहेत. (२) याच्याकाळीं यादव राज्याचा विस्तार फार मोठा असून तें वैभवाच्या शिखरावर होतें.



अंबाबाईचें देवालय ( मागील बाजू ) कोल्हापूर.



खिद्रापूरचें देवालय, कोल्हापूर स्टेट.

(३) गुजराथ, माळवा, काशी, मथुरा, कोंकण, म्हैसूर, पांड्य येथील इतरहि अनेक राजांचा त्यानें पराभव केला व कावेरीनदीच्या तटावर एक विजयस्तंभ उभारला. उत्तर म्हैसूर व तेलंगणाचा कांहीं प्रदेश आपल्या राज्यास जोडून त्यानें आपलें अपूर्व शौर्य जगाच्या निदर्शनास आणिलें. खिद्रापूर मंदिरांत सिंघणाच्या वेळचा एक शिलालेख मिळतो.

(४) लक्ष्मीधराचा मुलगा पं. चंगदेव यानें आपल्या बापाचें स्थान मंडित केलें व ज्योतिष शिकविण्यासाठीं एक विद्यालय स्थापन केलें.

२६ कृष्ण–सिंघणाचा नातू. (१) माळवा, गुजराथ, कोंकण, तेलंगण आणि चोलदेश येथील राजांबरोबर लढून शेवटले दोन देश यानें आपल्या राज्यास जोडले. (२) तसेंच पुष्कळ यज्ञ करून त्यांचा महिमा वाढविला, अनेक ब्राह्मणांना गांवें वगैरे दान दिलीं व हिंदुधर्माला पुष्कळ सहाय्य केलें.

२७ महादेव–(१) कृष्णाचा भाऊ. राज्यावर आल्यापासून याचें सारें आयुष्य मुलुखगिरींतच गेलें. गुजराथ, कोंकण, कर्नाटक, लाट, तेलंगण येथील राजांना वश करून घेऊन कोंकणच्या साम्राज्यांत त्यांचा अंतर्भाव केला. (२) कोंकणचा शिलहारवंशज राजा सोमेश्वर हा समुद्रकिनारीं गेला असतां सपरिवार बुडून मेला. (३) महादेवाचा एक उत्कृष्ट नियम असा होता कीं, स्त्रीबरोबर व मुलांबरोबर कधींहि युद्ध करावयाचें नाहीं. याचा फायदा घेऊन आपल्या राज्यांचें रक्षण करण्याकरितां तेलंगांनीं एका स्त्रीला व माळव्यांनीं एका मुलाला आपापल्या गादीवर बसविलें. (४) यानें पुष्कळ यज्ञ करून कीर्ति मिळविली. याला प्रौढप्रताप चक्रवर्ति ही संस्मरणीय पदवी आहे.

२८ रामदेव–महादेवाचा वारस. हाही माळव्याच्या व तेलंगणाच्या राजाशीं लढतच होता. याचें राज्य थेट म्हैसूरपर्यंत पसरलेलें होतें. या वेळीं संस्कृत भाषेचा अत्यंत उत्कर्ष झाला. वोपदेव पंडित याच काळीं झाला. त्यानें हरिलीला, मुक्तबोध, मुक्ताफल, तसेच अनेक वैद्यक ग्रंथ याबेळीं प्रसिद्ध केले. पंडितशिरोमणि कविवर हेमाद्रि हा या राजाचा मुख्य मंत्री व न्यायाधीश होता. याचा 'चतुर्वर्ग चिंतामणि' हा एक सुप्रसिद्ध पौराणिक ग्रंथ आहे. (५) ज्ञानेश्वरी या गीतेवरील अद्वितीय ग्रंथाचे कर्ते, सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय

संत व महाकवि महात्मा ज्ञानेश्वर हे याच काळीं होऊन गेले. (६) अल्लाउद्दीन व त्याचा सेनापति मलिक काफूर यांनीं दक्षिणेंत स्वाऱ्या केल्या. (७) १३१९ मध्ये शेवटचा राजा हरपाल याची चामडी सोलून काढून त्याच्या वंशाचा नाश केला व १३१९ मध्यें हा वंश नामशेष झाला.

## २९ ओरीसा येथील केसरी वंश.

अशोकाचे वेळेपासून या देशांत बौद्धधर्माचा सर्वत्र उत्तम प्रसार झाला होता हें त्या देशांतील बौद्ध लेणीं, इमारती व गुहा वगैरेवरून दिसून येतें. बौद्धकालचा इतिहास आह्मांला फारसा सांपडत नाहीं. इ. स. ४७४ मध्यें केसरीवंशाचा संस्थापक ययाति यानें बौद्धांना बाजूस सारून पौराणिक हिंदु धर्माचा प्रचार केला. या वंशांत एकदर ४४ राजे होऊन त्यांनीं सुमारें ७०० वर्षें राज्य केलें. अखेर ११३२ मध्यें गंगवंशानें हा वंश बुडविला.

केसरी राजांची राजधानी भुवनेश्वरी. ही नगरी त्यांनीं अनेक सुंदर इमारती बांधून सुशोभित केली होती. त्यांतील कांहीं मंदिरें व प्रासाद आजही शाबूद असून भारतवर्षीय स्थापत्यविद्येचे उत्कृष्ट नमुने आहेत. नृपकेसरीनें ( ९४१ ते ९५३ ) कटक नगर स्थापन केलें.

३० पूर्वेचा गंगवंश—याचें राज्य पूर्वीपासून ओरीसा आणि म्हैसूरमध्यें होत. तें बहुधा इ. स. पहिल्या शतकांत ओरीसाच्या एकाद्या भागांत स्थापलें असावें. पुराणामध्यें या वंशातील १०० राजांचीं नांवें आढळतात. केसरीवंशाच्या शेवटच्या राजास पदच्युत करून चोरगंग यानें सगळा ओरीसा प्रांत बळकावला. पुढें १५३४ पर्यंत २३ राजांनीं राज्य केलें. पहिले पहिले कांहीं राजे मोठे प्रतापी होते. गंगेश्वरानें (११५२ ते ११६६) गंगेपासून गोदावरीपर्यंत राज्य केलें. अनंग भीमदेव फार शक्तिमान् असून त्यानेंच हल्लींचें जगन्नाथपुरीचें सुंदर देवालय बांधिलें. प्रतापरुद्राचे वेळीं ( १५०४-१५३२ ) वैष्णवधर्माचा प्रसिद्ध प्रचारक चैतन्य हा ओरीसांत होऊन गेला. शेवटच्या गंगवंशीय राजाला मारून व त्याचें राज्य बळकावून गोविंद विद्याधर आपण गादीवर बसतो न बसतो तोंच मुसलमानी युद्धास सुरवात झाली. विद्याधरानंतर ४ राजे झाले. त्यांनीं १५५९ पर्यंत राज्य केलें. शेवटीं प्रसिद्ध मुसलमान सेनापति कलपहार



रजपुत–काल—    राजा राणींचें देऊळ. भुवनेश्वर.    [ पृष्ठ ११६

यानें जानपूरच्या लढाईत याच वंशांतील शेवटच्या राजास मारिलें, जगन्नाथपुरी लुटली आणि हिंदूंच्या राज्याचा नाश केला. अशा रीतीनें ओरीसा प्रांतांत इ. स. १५६० पर्यंत हिंदु राज्य होतें.

३१ पश्चिमेचा गंगवंश–(१००–१००४) यांतील पुष्कळ राजे जैन होते व विशेष म्हणजे त्यांपैकीं अनेक विद्याप्रेमी असून त्यांनीं स्वतः पुस्तकें लिहिलीं आहेत. या राजांनीं कानडीची बरीच उन्नति केली. गंगवाडी प्रांताचें नांव याच वंशावरून पडलें आहे. यांची राजधानी प्रथम नन्दागिरी (बंगलोरजवळ नंदीदुर्ग) होती. कालान्तरानें, ती कावेरी तीरावरील तालकाद शहरीं गेली. या राजांना कंगणी असेंहि नांव आहे. दक्षिणेंत पल्लवांच्या बरोबर व उत्तरेंत राष्ट्रकूट आणि चालुक्य यांचे बरोबर लढण्यांतच यांचा काल गेला. १००४ मध्यें चोलवंशी राजांनीं यांचें राज्य हिरावून घेतलें.

## दक्षिणी पल्लव (१००–१०००)

३२ कांचीचे पल्लवः–दुसऱ्या शतकांत पल्लवांचें राज्य कृष्णेपासून कावेरीपर्यंत पसरलें होतें. मद्रासच्या दक्षिणेस असलेलें कांचीवरम् नगर ही त्यांची राजधानी होती. चवथ्या शतकापासून पश्चिम किनारा व तेलगू देश यांवर पल्लव राजपुत्रच राज्य करीत असून त्यांच्या कांहीं शाखा वेंगी व बादामी या ठिकाणीं राज्य करीत होत्या.

३३ शिवस्कंदवर्मा–(इ.स. १५०) हा क्षत्रप रुद्रदामन याचा समकालीन असून महा शिवभक्त, पौराणिकधर्मप्रचारक व प्रतापशाली असा होता. त्यानें एक अश्वमेध केला. त्याच्या पश्चात् त्याच्या राज्याची वाढ झाल्याचें आढळून येतें. समुद्रगुप्तानें दक्षिणेवर मोहिम केली तेव्हां पल्लवांचें राज्य अति विस्तीर्ण होतें. चालुक्यांनीं उत्तरेच्या पल्लवांना बादामींतून व वेंगींतून हाकून दिलें तरी दक्षिणी पल्लव दक्षिणेच्या राजांशीं अजमासें ६०० वर्षे झुंजतच होते. पुलकेशीच्या काळीं पल्लव राजा महेन्द्रवर्मा (६००–६२५) याच्याबरोबर जी घनघोर लढाई झाली त्यामध्यें पल्लवांचा पराजय झाला. त्याच वेळीं चालुक्यांनीं आपल्या राज्याला वेंगी जोडली. महेन्द्रवर्म्यानें अनेक सुंदर मंदिरें खडकांत खोदून आपलें नांव चिरस्मरणीय केलें आहे.

३४ **नरसिंह वर्मा**—( ६२५-४५ ) महेंद्राचा पुत्र. पल्लवांमध्यें हा अत्यंत शक्तिमान् असा प्रसिद्ध राजा होऊन गेला. यानें दुसऱ्या पुलकेशीचा पराजय करून बादामी कांहीं वर्षें हस्तगत करून ठेविली. या समयाला ह्युनसांग नांवाचा चिनी प्रवाशी कांची नगर पहाण्यास आला होता. मदुरेचा घेर ५-६ मैल असून तेथील नागरिक वीर्यवान्, विद्याप्रिय, प्रामाणिक आणि देशभक्त होते असें तो म्हणतो. कांची नगराचा घेर सहा मैल असून त्यांत शंभरांवर बौद्ध मठ होते. या मठांत सरासरी दहा हजार महायान संप्रदायाचे बौद्ध भिक्षु रहात असत. हिंदूंची व जैनांचीं मोठमोठीं मंदिरें ऐंशीवर होतीं; त्यापैकीं महाबलिपुरम्‌चें मंदिर महेंद्र वर्म्यानें बांधिलें. याशिवाय धर्मराजरथ नामक मंदिरहि फार प्रसिद्ध आहे.

३५ **पल्लवांचा अधःपात**—पुलकेशीचा पुत्र पहिला विक्रम यानें लवकरच कांचीवर जय मिळवून वरील पराजयाचा वचपा काढिला. तरी यापुढेंहि २०१ वर्षेंपर्यंत छोट्याशा प्रदेशावर पल्लव राज्य करीत होते. परंतु शेजाऱ्या राज्यांबरोबर वारंवार लढाया होत असल्यामुळें त्यांचें बल घटू लागलें. इ. स. ७४० मध्यें चालुक्यांनीं पुन्हां कांची घेतल्यामुळे पल्लवांचा अपकर्ष सुरू झाला व अखेर ९०० मध्यें चोलाधिप आदित्यानें अपराजिताला जिंकून त्यांचा शेवट केला. पुढे १२०० पर्यंत चोलांचे मांडलिक म्हणून पल्लव राजपुत्र राज्य करीत राहिले. ७४० मध्यें नोलंब नामक त्यांच्या एका शाखेनें बंगलोरच्या उत्तरेस हेमवती या ठिकाणीं राज्य स्थापन केलें. तेथेंहि चालुक्यांबरोबर व गंगवंशी राजांबरोबर त्यांचें युद्ध होतच होतें. शेवटीं इ. स. १००० मध्यें त्यांचें राज्य अचानकच नाहींसे झालें.

३६ **पल्लवकालीन धार्मिक स्थिति**—पल्लवकालीं बौद्ध व जैनमत संपुष्टांत आलें असून पौराणिक मताची चलती झाली होती. म्हैसूरकडे व पश्चिम किनाऱ्यावर जैनमताचा प्रचार होता, परंतु इतरत्र शिवाची व विष्णूची पूजा सुरू झाली होती. पौराणिक देवतांचीं हजारों मंदिरें बांधलीं गेलीं आणि तामिल भाषेंत हजारों पुस्तकें लिहिलीं गेलीं. भारतीय कलेच्या दृष्टीनें पल्लवपद्धतीचें खोदकाम व बांधकाम अत्यंत महत्त्वाचें आहे. महाबलिपुरम् येथील आश्चर्यकारक लेणीं व त्यांतील प्रेक्षणीय उठावाचें खोदकाम हीं भारतीय शिल्पकलेच्या उत्कृष्टपणाची साक्ष पटवितात.




मदुरा येथील देवालय व प्रासाद.



तंजावर.



महाबालिपुरम्.

( पृष्ठ ११४

## ३७ पांड्य, चोल व चेर.

पांड्य, चोल व चेर हीं तीन हिंदु राज्यें हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकाला फार प्राचीन काळापासून राज्य करीत होतीं. अशोकाच्या वेळींसुद्धां तीं अस्तित्वांत होतीं असें त्याच्या दुसऱ्या शिलालेखावरून आढळतें. हिंदुस्थानांत दोन हजार वर्षें अखंड चाललेलीं हींच तीन राज्यें आहेत, ही फारच महत्वाची गोष्ट आहे.

३८ पाण्ड्य—हा वंश फार प्राचीन कालापासून राज्य करीत होता. पांड्य राजे आपला उद्भव पांडवाचा बाप पंडू याजपासून झाला असें म्हणत. हा वंश आर्यवंशी असून द्राविडांनीं आरंभिलेले राजकीय, धार्मिक व संस्कृतिपर विजय यानेंच पुरे केले; त्याचें राज्य हल्लींच्या टेनिव्हेली व मदुरा या भागांत होतें. पाण्ड्य राजाकडून आगस्टस् सीझर याजकडे खि. पू. २० व्या शतकांत पाठविलेल्या एका वकिलाचें स्ट्रॅबोनें वर्णन केलें आहे. पेरिप्लिसच्या वेळीं तें राज्य पश्चिम घांटापर्यंत पसरलें असून त्यांत त्रावणकोर सुद्धां समाविष्ट झालें होतें. त्याची राजधानी ताम्रपर्णीच्या कांठावरील कोरकई येथें पहिल्यानें असून नंतर ती मदुरा येथें नेण्यांत आली. मदुरा हें एक मोठें शहर असून त्याचे सुवर्ण दरवाजे रत्नजडित होते असें रामायणांत वर्णन आहे. त्यांतील राजांनीं क्रमाक्रमानें भव्य व टोलेजंग इमारती बांधून ती राजधानी सुशोभित केली होती. मिनार आखातांतील मोती काढण्याच्या सर्व जागा त्यांचे ताब्यांत असून ग्रीस, रोम, इजिप्त व पूर्वेकडील देश यांच्याशीं त्यांचा व्यपार चालत असल्यामुळें त्यांना व त्यांच्या प्रजेला पुष्कळ द्रव्य मिळे. मार्को पोलो असें वर्णन करतो कीं, कायल बंदर फारच मोठें व शोभिवंत होतें. राजांचे खजिने भरलेले होते; व ते बहुमोल रत्नें वापरीत. ते विद्याप्रेमी असून त्यांनीं एक महाविद्यालय उत्तम रीतीनें चालविलें होतें. ह्यूनसांगच्या काळीं बौद्धधर्माची अवनति झाली असून हिंदु व जैन धर्माची वाढ झाली होती. परंतु पुढें कांहीं कालानें झालेल्या धर्मच्छलानें जैनधर्माला धक्का बसला, व शेवटीं ब्राह्मणधर्म प्रस्थापित झाला. पांड्य राजे पल्लव, चोल व सिलोन येथील राजांशीं जरी वारंवार लढत होते तरी सोळाव्या शतकाच्या अखेरपर्यंत ते स्वतंत्रच होते.

३९चोलांचा प्रांत–पूर्व किनाऱ्यावर परमारपासून वेलारपर्यंत व पश्चिम-किनाऱ्यावर कुर्ग प्रान्ताच्या सरहद्दीपर्यंत पसरला होता. जुनी त्रिचनापल्ली ही त्याची राजधानी असून त्यांत कावेरीपट्टणम् हें एक मोठें बंदर व कांची हें एक मोठें शहर होतें.

चोलांच्या वेळची राज्यव्यवस्था–चोलांची राज्यव्यवस्था फारच व्यवस्थित असून ती ग्रामपंचायतीच्या पद्धतीवर होती. कांहीं गांवें एकत्रित होऊन " कुरम " नांवाची संघटना करण्यांत येत असे. प्रत्येक कुरम मध्यें महासभा नांवाच्या नियुक्त मंडळामार्फत गांवांचीं स्थानिक व्यवस्था चालत असे; कुरमला बरेच अधिकार असत, परंतु राज्याधिकारी त्यांच्यावर देखरेख करीत असत. प्रत्येक कुरममध्यें स्थानिक खजिना होता. आपापल्या हद्दींतील जमिनीवर त्यांची बरीच सत्ता चालत असून कारण-परत्वें त्या विकण्याचाही त्याला अधिकार असे. असे कांहीं कुरम मिळून एक जिल्हा किंवा नाडू होत असे; कांहीं जिल्हे एकत्र करून प्रांत किंवा कोटम् होई; व असे कांहीं प्रांत मिळून इलाखा किंवा मंडळ होत असे. अखिल चोल राज्याला चोलमंडळ असें नांव होतें.

सर्व उत्पन्नाचा सहावा हिस्सा सरकारसारा म्हणून घेतला जाई. मोठ्या प्रमाणावर उत्तम आकृतीचे कालवे तयार करण्यांत चोलांचें फार लक्ष असे. त्यांनीं पुष्कळच महत्त्वाचीं सार्वजनिक कामें केलीं.

४० चेर—पश्चिमेकडील चेरपुत्र किंवा केरलपुत्र या नांवाच्या तामील राज्याला पेरिप्लसनें सेरोबोथरा हें नांव दिलें आहे. एके काळीं त्याचा विस्तार केप कामोरीनपासून कारवारपर्यंत झाला होता. पेरिप्लसच्या वेळीं या राज्याचा दक्षिण भाग व कांहीं काळानें उत्तरभागही पांड्यांनीं आपल्या राज्याला जोडला; यामुळें हल्लींचें मलबार व कोचीन यांचा त्या राज्यांत समावेश झाला. कगनोरच्या समोर असलेलें कारवार त्यांची राजधानी होती; शिवाय त्यांचीं व्यापाराचीं ठाणीं बरींच होतीं.

# प्रश्नमाला.

१ भौगोलिक परिस्थितीचा मनुष्यावर काय परिणाम होतो तें हिंदुस्थान, मिसर आणि युरोपमधील रहिवाशांचीं उदाहरणें देऊन सांगा.

२ वैदिक साहित्यामधील मुख्य ग्रंथांचीं नांवें देऊन त्या कालाच्या इतिहासलेखनांत या ग्रंथांचें महत्त्व काय तें सांगा.

३ हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास बनविण्याचीं साधनें आणि त्यांतील मुख्य मुख्य गोष्टी यांचें विवरण करा.

४ वैदिक संस्कृतीवर एक निबंध लिहा.

५ मोहन–जो–दारो येथील खोदकामाचें महत्त्व दाखवा.

६ श्रीरामचंद्रकालीन संस्कृतीवर निबंध लिहा ?

७ रामायण काव्याचें महत्त्व दाखवा.

८ श्रीरामचंद्र आणि युधिष्ठिर हे कोणत्या कालांत झाले त्याचें विवरण करा.

९ महाभारतकालीन संस्कृतीचें वर्णन करा. खि. पू. एक हजार वर्षांच्या कालीं हिंदुस्थानची आर्थिक स्थिति कशी होती ?

१० हिंदु तत्त्वज्ञानाच्या निरनिराळ्या संप्रदायांविषयीं माहिती, पुराणांच्या लेखनाचा काल, ब्राह्मणग्रंथ, उपनिषदें व आरण्यकें यांचें महत्त्व यांवर टीपा द्या.

११ मेगॅस्थेनिस, पेरिप्लस, ऑलबरूनी, ह्यूनसांग यांनीं केलेलें हिंदुस्थानचें वर्णन द्या.

१२ अशोक राजानें धर्माचा प्रसार कोणत्या साधनांनीं केला तें लिहा.

१३ जैनधर्म, बौद्धधर्म व चार्वाक मत यांपैकीं प्रत्येकाची शिकवणूक संक्षेपानें सांगा.

१४ जातिव्यवस्था केव्हां सुरू झाली त्याचें विवेचन करा.

१५ मौर्यांच्या अमदानींतील हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेचें वर्णन करा.

१६ हिंदु ऐतिहासिक वाङ्मय उपलब्ध कां नाहीं याविषयीं कारणं सांगा.

१७ शिकंदर बादशहाच्या नंतर झालेल्या निरनिराळ्या ग्रीक स्वाऱ्यांचें वर्णन करा.

१८ मौर्य राज्याचा ऱ्हास व गुप्तांचा उदय या दरम्यानचा हिंदुस्थानचा धार्मिक व राजकीय इतिहास थोडक्यांत सांगा.

१९ प्राचीन भारतवर्षांतील ज्योतिषशास्त्र, गणितशास्त्र, नौकाशास्त्र, विश्वविद्यालयें, ग्रामसंस्था, श्रमसमित्या ( Guilds ), लोकांची आर्थिक स्थिति, स्त्रियांची योग्यता, या प्रत्येकांवर टीपा द्या.

२० आंध्रवंशाचें राज्य, बदामी, वेंगी व गुजराथ येथील चालुक्य घराणीं, देवगिरीचे यादव, ओरिसांतील गंगवंश व केसरी वंश, बिहारचा पाल व बंगालचा सेन वंश, राष्ट्रकूट, बल्लाल, चोल, चेर व पांड्य या प्रत्येकांविषयीं थोडक्यांत माहिती द्या.

२१ वैदिक, बौद्ध, जैन, व हिंदु धर्म यांच्या ऱ्हासाचीं कारणें सांगा.

२२ जैनधर्म व बौद्धधर्म यांच्या उत्कर्षाचीं व प्रगतीचीं कारणें द्या.

२३ हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन म्हणजे काय ?

२४ बौद्धधर्म आणि जैनधर्म, आणि बौद्धधर्म व हिंदुधर्म यांतील साम्य व भेद दाखवा.

२५ पुढील गोष्टी दाखविणारे नकाशे काढा.

१ वेदकालीन हिंदुस्थान, २ महाभारतकालीन हिंदुस्थान, ३ मौर्य साम्राज्य, ४ कनिष्काचें साम्राज्य, ५ गुप्त साम्राज्य, ६ हर्षाचें साम्राज्य, ७ दक्षिणेंतील राज्यें, संस्थानें व हिंदु साम्राज्यें, ८ रजपुतांनीं व हिंदु लोकांनीं व्यापलेला हिंदुस्थानचा भाग.

२६ बौद्धकालाच्या पूर्वी, बौद्ध कालीं, पहिलें ख्रिस्ती शतक व गुप्त काल यावेळीं हिंदुस्थानांत जलमार्गानें कसा व्यापार चालत असे तें थोडक्यांत सांगा.

२७ चंद्रगुप्त मौर्याच्या काळीं मुलकी व लष्करी राज्यव्यवस्था कशी होती तें थोडक्यांत पण स्पष्टपणें लिहा.

२८ प्राचीन काळीं चीन, रोम, ग्रीस व दक्षिण द्वीपें, या देशांशीं हिंदुस्थानचे कशा प्रकारचे संबंध होते याचें विवेचन करा.

२९ कुशान वंश पश्चिमेकडील क्षत्रप व इंडो-ग्रीक राजे यांविषयीं थोडक्यांत माहिती सांगा.

३० दक्षिण हिंदुस्थानांतील राज्यांविषयीं थोडक्यांत माहिती लिहा.

३१ हिंदुस्थानांतील अति प्राचीन कालापासून शिकंदर बादशहाच्या स्वारीपर्यंत हिंदुस्थानांत झालेल्या ऐतिहासिक युगांचें विवेचन करा.

३२ शिकंदर बादशाहा व इतर इंडो-ग्रीक राजे यांच्या स्वारीमुळें हिंदुस्थानच्या संस्कृतीवर झालेल्या परिणामांचें विवेचन करा.

३३ शिशुनाग वंशाचें थोडक्यांत वर्णन करून हिंदुस्थानच्या इतिहासाला त्याची काय मदत झाली तें संक्षेपरूपानें सांगा.

३४ गुप्त सम्राटांपैकीं कोणत्याही तिघांविषयीं थोडक्यांत माहिती द्या.

३५ गुप्तकालाला हिंदुस्थानाचें सुवर्णयुग कां म्हणतात तें सकारण सांगा.

३६ चंद्रगुप्ताच्या कारकीर्दीचें थोडक्यांत वर्णन करून त्याचा राज्य-विस्तार दाखविणारा नकाशा काढा.

३७ काश्मीर व अफगाणिस्थान या देशांचा थोडक्यांत इतिहास सांगा.

३८ रजपूत वंशाच्या उत्पत्तीविषयीं माहिती सांगून शिसोदिया, राठोड, कच्छवाह, प्रमार, तोमार, चव्हाण, चालुक्य, चेदी, यादव, वाघेल, यांच्यावर टीपा लिहा.

३९ अशोकाच्या कोरींव लेण्यांचें वर्गीकरण करा.

४० शुंग व कण्व या वंशाविषयीं थोडक्यांत माहिती लिहा.

४१ शिकंदर बादशहाच्या स्वारीचें वर्णन करून भारतीय संस्कृतीवर त्याचे काय परिणाम झाले तें सांगा.

४२ दहाव्या शतकांमधील हिंदुस्थानांतील राजकीय स्थिति दाखविणारा नकाशा काढा.

४३ रजपूत युगाचें महत्व काय?

४४ रजपुतांच्या वैभवाचें कारण द्या.

# याच लेखकाचीं इतर पुस्तकें.

## ( In English ).

1. Commercial Relations between India and England.
2. The Industrial Decline in India.
3. From the Counter to the Crown; or A study of the Causes which led to the Romance of the Conquest of India by a Commercial Corporation. ( In Press ).
4. The Industrial Survey of Kolhapur City. ( In Press ).
5. Demands of Democracy.
6. Shivaji the Great from the English Records. ( Under Preparation ).
7. Hindu Philosphers on Evolution.

## हिंदी.

8. अर्थशास्त्र.
9. भारतवर्षका संक्षिप्त इतिहास.
10. प्राचीन भारतकी राज्यप्रणाली.
11. स्वराज्य और प्रजातंत्र राज्य.
12. अग्निहोत्र व्याख्या.
13. शुक्रनीति.
14. वेद–ईश्वरीय ज्ञान.